प्रकाशक : **श्री अजित सी. पटेल**
**दादा भगवान आराधना ट्रस्ट,**
दादा दर्शन, 5, ममतापार्क सोसायटी,
नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा,
अहमदाबाद - 380014, गुजरात.
**फोन - ( 079 ) 39830100**



**प्रथम आवृत्ति :** २००० नोव्हेंबर २०१८

**भाव मूल्य :** 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य : २० रुपये**

**मुद्रक :** अंबा ऑफसेट
B-99, इलेक्ट्रॉनिक्स GIDC,
क-6 रोड, सेक्टर-25, गांधीनगर-382044
**फोन :** (079) 39830341

# त्रिमंत्र







नमो अरिहंताणं
नमो सिद्धाणं
नमो आयरियाणं
नमो उवज्झायाणं
नमो लोए सव्वसाहूणं
एसो पंच नमुक्कारो,
सव्व पावप्पणासणो
मंगलाणं च सव्वेसिं,
पढमं हवइ मंगलम् ॥१॥
ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥२॥
ॐ नमः शिवाय ॥३॥
जय सच्चिदानंद



## दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित पुस्तके

### मराठी

१. भोगतो त्याची चूक
२. एडजस्ट एवरीव्हेर
३. जे घडले तोच न्याय
४. संघर्ष टाळा
५. मी कोण आहे ?
६. क्रोध
७. चिंता
८. प्रतिक्रमण
९. भावना सुधारे जन्मोजन्म
१०. कर्माचे विज्ञान
११. पाप-पुण्य
१२. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार
१३. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार
१४. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य
१५. मानव धर्म
१६. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
१७. सेवा-परोपकार
१८. दान
१९. त्रिमंत्र
२०. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
२१. चमत्कार
२२. सत्य-असत्याचे रहस्य
२३. वाणी, व्यवहारात
२४. पैशांचा व्यवहार
२५. क्लेश रहित जीवन
२६. निजदोष दर्शनाने...निर्दोष !
२७. प्रेम
२८. गुरू-शिष्य
२९. अहिंसा

### हिन्दी

१. ज्ञानी पुरुष की पहचान
२. सर्व दु:खों से मुक्ति
३. कर्म का सिद्धांत
४. आत्मबोध
५. मैं कौन हूँ ?
६. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर...
७. भुगते उसी की भूल
८. एडजस्ट एवरीव्हेयर
९. टकराव टालिए
१०. हुआ सो न्याय
११. चिंता
१२. क्रोध
१३. प्रतिक्रमण
१४. दादा भगवान कौन ?
१५. पैसों का व्यवहार
१६. अंत:करण का स्वरूप
१७. जगत कर्ता कौन ?
१८. त्रिमंत्र
१९. भावना से सुधरे जन्मोंजन्म
२०. प्रेम
२१. माता-पिता और बच्चों का व्यवहार
२२. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य
२३. दान
२४. मानव धर्म
२५. सेवा-परोपकार
२६. मृत्यु समय, पहले और पश्चात
२७. निजदोष दर्शन से... निर्दोष
२८. पति-पत्नी का दिव्य व्यवहार
२९. क्लेश रहित जीवन
३०. गुरु-शिष्य
३१. अहिंसा
३२. सत्य-असत्य के रहस्य
३३. चमत्कार
३४. पाप-पुण्य
३५. वाणी, व्यवहार में...
३६. कर्म का विज्ञान
३७. आप्तवाणी - १ से ९ और १३ (पूर्वार्ध-उत्तरार्ध)
३८. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (पूर्वार्ध-उत्तरार्ध)

★ **दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट www.dadabhagwan.org वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।**

★ **प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।**

## दादा भगवान कोण ?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रुपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरुपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भूत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवत आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भूत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानीपुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

मी तर, काही लोकांना माझ्या हातून सिद्धी प्रदान करणार आहे. नंतर कोणीतरी हवा की नको! नंतर लोकांना मार्ग तर हवाच ना?

**- दादाश्री**

परम पूज्य दादाश्री गावोगावी, देशविदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित होते. दादाश्रींनी आपल्या हयातीतच पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत. पूज्य दीपकभाई देसाई यांना दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. पू. नीरूमांच्या उपस्थितीतच त्यांच्याच आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात कित्येक ठिकाणी जाऊन मुमुक्षुंना आत्मज्ञान प्राप्ती करवित असत, हे कार्य नीरूमांच्या देहविलयानंतर आजसुद्धा चालूच आहे. या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु या संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

पुस्तकात मुद्रित वाणी मोक्षार्थीला मार्गदर्शनासाठी अत्यंत उपयोगी सिद्ध होईल, परंतु मोक्षप्राप्तीसाठी आत्मज्ञान प्राप्त करणे गरजेचे आहे. अक्रम मार्गाने आत्मज्ञानप्राप्तीचा मार्ग आजसुद्धा चालुच आहे. जसा प्रज्वलित दिवाच दुसऱ्या दिव्याला प्रज्वलित करू शकतो, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष आत्मज्ञानींकडून आत्मज्ञान प्राप्त करूनच स्वत:चा आत्मा जागृत होऊ शकतो.

## संपादकीय

प्रेम हा शब्द इतका चुरगळला गेला आहे की आपल्याला पावलोपावली असा प्रश्न पडतो की याला काय प्रेम म्हणायचे? प्रेम असेल तिथे असे असू शकते का? खरे प्रेम कुठे मिळेल? खरे प्रेम कशास म्हणावे?

प्रेमाची यथार्थ व्याख्या तर प्रेममूर्ती ज्ञानीच देऊ शकतात. जे कधी वाढत नाही आणि कमी होत नाही तेच खरे प्रेम. जे वाढत जाते आणि नंतर कमी होते ते प्रेम नव्हे, ती आसक्ती आहे. ज्यात काही अपेक्षा नाही, स्वार्थ नाही, मतलब नाही, की दोषदृष्टी नाही, निरंतर एकसमान वाहतच राहते, फुले वाहिली तरी उफाडा येणार नाही आणि शिव्या दिल्या तरी अभाव होणार नाही, असे अघट-अपार प्रेम तेच साक्षात परमात्म प्रेम आहे. अशा अनुपम प्रेमाचे दर्शन तर ज्ञानी पुरुषात किंवा संपूर्ण वीतराग भगवंतातच होते.

आपले लोक तर मोहालाही प्रेम समजतात! मोहात मोबदल्याची अपेक्षा असते. अपेक्षा पूर्ण झाली नाही की आत कोलाहल माजतो. त्यावरुन कळते की ते शुद्ध प्रेम नव्हते. प्रेमात तर सिन्सियारिटी असते संकुचितता नसते. व्यवहारात आईचे प्रेम उच्च दर्जाचे मानले आहे. पण तरीही त्यात कुठे ना कुठे अपेक्षा आणि अभाव दिसतोच. आणि मोह असल्यामुळे ती आसक्तीच म्हटली जाईल.

मुलगा बारावीत ९० टक्के मिळवून पास झाला तर आई-वडील खुश होतात, पार्टी देतात व मुलाचे कौतुक करताना थकतही नाहीत. त्याला स्कूटर आणून देतात. तोच मुलगा चार दिवसानंतर स्कुटर ठोकून आला, स्कूटरची फार वाट लावली तर तेच आई-वडिल त्याला काय म्हणतात? 'तुला अक्कलच नाही, मूर्ख आहेस आता तुला काहीच मिळणार नाही.' चारच दिवसात त्याच्या हुशारीचे सर्टिफिकेट परत घेतले. सगळे प्रेम ओसरले! याला काय प्रेम म्हणायचे?

व्यवहारात सुद्धा मुले असो नोकर असो किंवा कोणीही असो, सगळे प्रेमानेच वश होतात. इतर शस्त्र तिथे निर्रथक ठरतात.

या काळात अशा प्रेमाचे दर्शन हजारो लोकांना परमात्म स्वरुप दादा भगवान यांच्यात झाले. एकादा जरी कोणी त्यांची ही अभेदता चाखली असेल तो निरंतर त्यांच्या निदिध्यासनात राहतो किंवा त्यांचेच स्मरण करत राहतो, तो जरी संसारात गुरफटलेला असेल तरीही. हजारो लोक दादाश्रींना वर्षानुवर्ष एकक्षण सुद्धा विसरत नाहीत, हे या काळाचे मोठे आश्चर्यच आहे. हजारो लोक त्यांच्या सानिध्यात आले पण त्यांची करुणा, त्यांच्या प्रेमाचा वर्षाव प्रत्येकांनी अनुभवला. प्रत्येकाला असेच वाटते की माझ्यावर त्यांची सर्वात अधिक कृपा आहे, ते राजी आहेत.

आणि संपूर्ण वीतरागांच्या प्रेमाचा तर जगात दुसरा पर्यायच सापडणार नाही. एकदाच जरी वीतरागांचे, त्यांच्या वीतरागतेचे दर्शन झाले तर तिथे तो आयुष्यभर समर्पित होतो. त्या प्रेमाला तो क्षणभरही विसरु शकत नाही.

समोरच्या व्यक्तीचे आत्यंतिक कल्याण कसे होईल हेच लक्ष्य निरंतर असल्यामुळे प्रेम व करुणा फलित होताना दिसते. जगात जे कधी पाहिले नाही, ऐकले नाही, श्रद्धेत आले नाही की अनुभवलेही नाही, असे परमात्म प्रेम प्रत्यक्ष प्राप्त करायचे असेल तर प्रेम स्वरुप ज्ञानींची भजना करावी. बाकी तर हे सर्व शब्दात सामावेल असे नाही.

**- डॉ. नीरुबहन अमीनचे जय सच्चिदानंद**

# प्रेम

## प्रेम शब्द अलौकिक भाषेचा

**प्रश्नकर्ता :** वास्तविक रित्या प्रेम म्हणजे काय ? मला ते सविस्तरपणे समजून घ्यायचे आहे.

**दादाश्री :** जगात जे प्रेम बोलले जाते ना, ते प्रेमाला न समजल्यामुळे बोलतात. प्रेमाची काही व्याख्या तर असेल की नाही ? प्रेमाची डेफिनेशन काय आहे ?

**प्रश्नकर्ता :** कोणी अटॅचमेंट म्हणेल, कोणी वात्सल्य म्हणेल. बऱ्याच प्रकारचे प्रेम आहेत.

**दादाश्री :** नाही, पण खरोखर ज्यास प्रेम म्हटले जाते, त्याची काही व्याख्या तर असेलच ना ?

**प्रश्नकर्ता :** मला आपल्याकडून कोणत्याही फळाची आशा नसेल, त्यास आपण खरे प्रेम म्हणू शकतो ?

**दादाश्री :** ते प्रेम नाहीच. प्रेम संसारात नसतेच. ते अलौकिक तत्व आहे. संसारात जेव्हापासून अलौकिक भाषा समजायला लागते, तेव्हापासूनच प्रेमाचे उपादान होते.

**प्रश्नकर्ता :** जगात जे प्रेमाचे तत्व समजावले आहे ते काय आहे ?

**दादाश्री :** जगात जो प्रेम शब्द आहे ना, तो अलौकिक भाषेचा शब्द आहे, तो लोकव्यवहारात आलेला आहे. बाकी, आपले लोक प्रेमाला समजतच नाहीत.

## यात खरे प्रेम कुठे?

तुमच्यात प्रेम आहे का?

तुमच्या, मुलावर तुमचे प्रेम आहे?

**प्रश्नकर्ता :** प्रेम तर असणारच ना!

**दादाश्री :** मग त्याला कधी मारता का? मुलांना कधीच मारले नाही? रागावलात सुद्धा नाही?

**प्रश्नकर्ता :** कधीतरी तर रागवावेच लागते ना?

**दादाश्री :** तर प्रेम अशी वस्तू आहे की दोष दिसतच नाही. दोष दिसतात म्हणजे ते प्रेम नव्हतेच. असे वाटते का तुम्हाला? मला या सर्वांवर प्रेम आहे. आत्तापर्यंत मला कोणाचाही दोष दिसला नाही. मग आपले प्रेम कोणावर आहे ते सांगा ना मला? तुम्ही म्हणता माझ्याजवळ प्रेमाचा ठेवा आहे, तर तो कुठे आहे?

## खरे प्रेम असते निर्हेतूक

**प्रश्नकर्ता :** तर मग परमेश्वराप्रति असलेले प्रेम, यालाच प्रेम म्हटले जाईल ना?

**दादाश्री :** नाही, तुम्हाला परमेश्वराप्रति सुद्धा प्रेम नाही. प्रेम ही वस्तूच वेगळी आहे. प्रेम कुठल्याही हेतूविना असले पाहिजे. निर्हेतूक असले पाहिजे, परमेश्वराप्रति प्रेम आहे मग इतरांवर प्रेम का नाही करत? त्यांच्याकडे काही काम आहे का तुम्हाला! आईवर प्रेम आहे, कारण तिच्याकडे काही काम आहे. परंतु प्रेम निर्हेतूक असायला हवे. मला तुमच्यावरही प्रेम आहे आणि या सर्वांवर सुद्धा प्रेम आहे. परंतु यामागे माझा काही हेतू नाही!

## नाही स्वार्थ प्रेमात

बाकी, हा तर जगात स्वार्थ आहे. 'मी आहे' असा अहंकार आहे तोपर्यंत स्वार्थ आहे. आणि जिथे स्वार्थ असेल तिथे प्रेम असू शकत नाही.

म्हणजे जिथे स्वार्थ असेल तिथे प्रेम असूच शकत नाही, आणि प्रेम असेल तिथे स्वार्थ असू शकत नाही.

अर्थात जिथे स्वार्थ नसेल तिथेच शुद्ध प्रेम असते. स्वार्थ केव्हा नसतो? 'तुझे-माझे' नसेल तेव्हाच स्वार्थ नसतो. 'तुझे-माझे' आहे तिथे नक्कीच स्वार्थ आहे. आणि जिथे 'तुझे-माझे' आहे तिथे अज्ञानता आहे. अज्ञानतेमुळे 'तुझे-माझे' झाले. 'तुझे-माझे' होत असल्यामुळे स्वार्थ आहे. आणि जिथे स्वार्थ आहे तिथे प्रेम नसते. 'तुझे-माझे ' केव्हा होत नाही? ज्ञान असेल तरच 'तुझे-माझे' होत नाही. ज्ञानाशिवाय तर तुझे-माझे होतच असते ना? पण तरी पटकन समजेल अशी ही गोष्ट नाही.

जगातील लोक प्रेम म्हणतात ती भ्रांतभाषेची गोष्ट आहे. फसवण्याची गोष्ट आहे. अलौकिक प्रेमाची *हुंफ* (प्रेमाचा ओलावा)तर फार वेगळीच असते. प्रेम तर सर्वात मोठी वस्तू आहे.

## अडीच अक्षर प्रेमाचे

म्हणून तर कबीर साहेबांनी म्हटले,

*'पोथी पढ़ पढ़ जग मुआ, पंडित भया न कोई,*
*ढाई अक्षर प्रेम का, पढ़े सो पंडित होई.'*

प्रेमाचे अडीच अक्षर, एवढेच जरी समजले तरी पुष्कळ झाले. बाकी, पुस्तक वाचणाऱ्यांना तर कबीर साहेबांनी फार कडक शब्दात सांगितले की, ही पुस्तके वाचून-वाचून तर जग मेले, परंतु पंडित कोणीही झाले नाही, फक्त प्रेमाची अडीच अक्षरे समजण्याकरीता, पण तरी अडीच अक्षरे प्राप्त झाली नाहीत आणि भटकत राहिले. म्हणजे फक्त पुस्तकच वाचत बसतात, तर हा सर्व वेडपणाच आहे. परंतु प्रेमाची मात्र अडीच अक्षरे समजला तो पंडित झाला. असे कबीर साहेबांनी सांगितले. तुम्ही कबीर साहेबांच्या गोष्टी ऐकल्या आहेत का?

प्रेम असेल तर कधीही वेगळे होणार नाही. हे सर्व तर मतलबी प्रेम आहे, मतलबी प्रेमाला प्रेम म्हणता येईल का?

**प्रश्नकर्ता :** मग त्यास आसक्ती म्हटली जाते?

**दादाश्री :** आसक्तीच आहे. आणि प्रेम हा तर अनासक्त योग आहे, अनासक्त योगामुळे खरे प्रेम उत्पन्न होते.

## प्रेमाची यथार्थ व्याख्या

**दादाश्री :** वॉट इज द डेफिनेशन ऑफ लव? (प्रेमाची व्याख्या काय?)

**प्रश्नकर्ता :** मला माहीत नाही. तुम्ही समजवा.

**दादाश्री :** अरे, मीच लहानपणापासून प्रेमाची व्याख्या शोधत होतो ना? मला वाटत असे की हे प्रेम काय असेल? लोक 'प्रेम-प्रेम' बोलतात, ते प्रेम म्हणजे नेमके काय असेल? म्हणून मग मी सर्व पुस्तके उघडून पाहिली, सर्व शास्त्रे वाचली, परंतु मला प्रेमाची व्याख्या कुठेही सापडली नाही. मला आश्चर्यच वाटले की, कोणत्याही शास्त्रात 'प्रेम म्हणजे काय,' याची व्याख्याच नाही?! मग जेव्हा कबीर साहेबांची काही पुस्तके वाचली, तेव्हा मनाची संतुष्टी झाली की प्रेमाची व्याख्या तर या कबीर साहेबांनीच दिली आहे. ती व्याख्या मला उपयोगी पडली, ते काय म्हणतात,

*'घडी चढ़े, घडी उतरे, वह तो प्रेम न होय,*
*अघट प्रेम ही हृदय बसे, प्रेम कहिये सोय.'*

अशी त्यांनी व्याख्या दिली, मला तर ती व्याख्या फार सुंदर वाटली, 'मानावे लागेल कबीर साहेब, धन्य आहे!' हेच सर्वात खरे प्रेम! घटक्यात वाढते आणि घटक्यात उतरते त्यास प्रेम कसे म्हणता येईल?

**प्रश्नकर्ता :** मग खरे प्रेम कशास म्हणतात?

**दादाश्री :** खरे प्रेम, म्हणजे जे कधी वाढत नाही, कमी होत नाही ते! आम्हा ज्ञानींचे प्रेम असेच असते, ते कधी कमी-जास्त होत नाही. असे आमचे खरे प्रेम संपूर्ण जगावर असते, आणि असे प्रेम तोच परमात्मा.

**प्रश्नकर्ता :** पण तरीही जगात कुठे तरी प्रेम असेलच ना?

**दादाश्री :** प्रेम कुठेच नाही. प्रेमासारखी वस्तूच या जगात नाही. ही सगळी आसक्तीच आहे. काहीतरी उलट-सुलट बोलल्यावर लगेच कळते.

समजा, आज आपला भाऊ परदेशातून आला, तेव्हा आज तर अगदी त्याच्याचसोबत बसून राहायला आवडते. त्याच्यासोबत जेवायला-फिरायला खूप आवडते.

आणि जर दुसऱ्या दिवशी तो आपल्याला म्हणाला की, 'तुम्ही नोनसेन्स आहात' तर मग झाले! आणि 'ज्ञानी' पुरुषास तर सात वेळा नोनसेन्स म्हटले तरीही ते म्हणतील 'हो भाऊ, तू बैस ना, इथे बैस.' कारण 'ज्ञानी' जाणतात की हा बोलतच नाही. ही तर रेकॉर्ड बोलत आहे.

खरे प्रेम तर कसे असते की ज्याच्या मागे कधी द्वेष नसतो. जिथे प्रेमात, प्रेमामागे द्वेष आहे, त्या प्रेमाला प्रेम कसे म्हणता येईल? एकसमान प्रेम असले पाहिजे.

## 'प्रेम,' तिथेच परमात्मा

**प्रश्नकर्ता :** तर खरे प्रेम म्हणजे कधी कमी-जास्त होत नाही?

**दादाश्री :** खरे प्रेम कधीही कमी-जास्त होत नाही. हे तर प्रेम जडले असेल, पण जर कधी त्याला शिव्या दिल्या तर त्याच्याशी भांडण होते आणि हार-तुरे घातले तर तो परत आपल्याला चिकटतो.

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात तर कमी-जास्त होतच असते.

**दादाश्री :** या लोकांचे प्रेम तर दिवसभर कमी-जास्त होतच राहते ना! मुला-मुलींवर, सर्वांवर कमी-जास्त होतच राहते ना! नातेवाईक, सर्व ठिकाणी कमी-जास्त होतच राहते! अरे, स्वत:वर सुद्धा कमी-जास्त होत राहते! घटक्यात आरशात पाहिले की म्हणेल, 'आता मी सुंदर दिसत आहे.' आणि घटक्यात म्हणेल की 'नाही, बरोबर नाही.' म्हणजे स्वत:वरचे प्रेम देखील कमी-जास्त होते. हे सर्व जबाबदारी न समजल्यामुळेच होत असते ना! केवढी मोठी जबाबदारी!

**प्रश्नकर्ता :** मग हे लोक म्हणतात ना, प्रेम शिका, प्रेम शिका.

**दादाश्री :** पण हे प्रेमच नाही ना! या सर्व लौकिक गोष्टी आहेत, याला प्रेम म्हणणारच कोण? लोकांचे प्रेम की जे कमी-जास्त होत असते ती सर्व आसक्ती, निव्वळ आसक्तीच आहे. जगात आसक्तीच आहे. जगाने प्रेम कधी पाहिलेच नाही. आमचे प्रेम शुद्ध प्रेम आहे, म्हणून लोकांवर परिणाम होतो. लोकांना फायदा होतो, अन्यथा फायदा होणारच नाही ना!

जेव्हा केव्हा 'ज्ञानी पुरुष' किंवा भगवंत असतील, तेव्हा प्रेम बघायला मिळते. प्रेम कमी-जास्त होत नाही, ते अनासक्त असते. ज्ञानींचे असे प्रेम तोच परमात्मा आहे. खरे प्रेम तोच परमात्मा आहे. दुसरी कोणतीही वस्तू परमात्मा नाहीच. खरे प्रेम, तिथे परमात्मापद प्रकट होते!

## सदैव अघट प्रेम ज्ञानींचे

**प्रश्नकर्ता :** मग या प्रेमाचे प्रकार किती आहेत, कसे आहेत, ते सर्व समजवा ना.

**दादाश्री :** प्रेमाचे दोनच प्रकार आहेत. एक आहे घटणारे-वाढणारे, घटते तेव्हा आसक्ती म्हणतात आणि वाढते तेव्हाही आसक्ती म्हणतात. आणि दुसरे घटत-वाढत नाही, असे अनासक्त प्रेम, असे प्रेम ज्ञानींचेच असते.

ज्ञानींचे प्रेम तर शुद्ध प्रेम आहे. असे प्रेम कुठेही पाहायला मिळणार नाही. जगात तुम्ही जिथेही पाहता ते सर्वच प्रेम स्वार्थवाले प्रेम आहे. पती-पत्नीचे, आई-वडिलांचे, पिता-पुत्राचे, आई-मुलाचे, शेठ-नोकराचे, प्रत्येकांचे प्रेम स्वार्थवाले आहे. ते केव्हा लक्षात येते की, जेव्हा ते प्रेम फ्रॅक्चर होते तेव्हा. जोपर्यंत गोडवा वाटत असतो तोपर्यंत काही वाटत नाही, पण जर कटुता उत्पन्न झाली की मग समजते. अरे, आयुष्यभर वडिलांच्या आज्ञेत राहिला असेल आणि एकदाच जरी परिस्थीतिवश रागाने मुलगा वडिलांना म्हणाला की, तुम्ही बेअक्कल आहात, तर आयुष्यभराचे संबंध तुटतात. वडील म्हणतील, 'तू माझा मुलगा नाहीस, आणि मी तुझा

बाप नाही.' जर खरे प्रेम असेल तर ते नेहमीसाठी जसेच्या तसेच राहील. मग शिव्या देवो की भांडण करो. याशिवायच्या प्रेमास खरे प्रेम कसे म्हणता येईल? स्वार्थ असलेले प्रेम त्यासच आसक्ती म्हटली जाते. ते म्हणजे व्यापारी आणि ग्राहकासारखे प्रेम आहे, सौदेबाजी आहे. जगातील प्रेमास आसक्ती म्हटली जाते. प्रेम तर त्यास म्हटले जाते की नेहमी सोबतच रहावेसे वाटते. त्याच्या सर्व गोष्टी चांगल्याच वाटतात. त्यात ॲक्शन आणि रिॲक्शन नसतात. प्रेमाचा प्रवाह एक सारखाच वाहत असतो. कमी-जास्त होत नाही, पूरण-गलन होत नाही. आसक्ती पूरण-गलन स्वभावाची असते.

एखादा मुलगा जर बिनअक्क्लेची गोष्ट करेल की, 'दादाजी, आपल्याला तर मी कधी जेवायला सुद्धा बोलवणार नाही आणि पाणी सुद्धा पाजणार नाही.' तरी पण 'दादाजीं' चे प्रेम कमी होणार नाही आणि नेहमीच चांगले भोजन खाऊ घातले तरी सुद्धा 'दादाजी' चे प्रेम वाढणार नाही, याला प्रेम म्हणतात. म्हणजे जेवायला बोलवले तरी प्रेम आणि नाही बोलवले तरी सुद्धा प्रेम, शिव्या दिल्या तरी प्रेम आणि शिव्या दिल्या नाहीत तरी प्रेम, सर्वत्र प्रेमच दिसेल. म्हणूनच खरे प्रेम तर आमचे म्हटले जाते. प्रेम जसेच्या तसेच आहे ना? पहिल्या दिवशी जसे होते तसेच्या तसेच आजही आहे ना? अरे, तुम्ही मला वीस वर्षांनी भेटाल ना, तरी सुद्धा प्रेम कमी-जास्त होणार नाही, प्रेम जसेच्या तसेच दिसेल.

## स्वार्थाशिवायचा स्नेह नाही संसारात

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात आईचे प्रेम अधिक चांगले मानले जाते.

**दादाश्री :** मग दुसऱ्या नंबरवर?

**प्रश्नकर्ता :** दुसरे कोणतेही नाही. दुसरे सर्व स्वार्थाचेच प्रेम आहे.

**दादाश्री :** असे होय? भाऊ-बीऊ सर्व स्वार्थ? नाही, तुम्ही प्रयोग करून पाहिले नसेल?

**प्रश्नकर्ता :** सर्व अनुभव आहेत.

**दादाश्री :** आणि हे लोक रडतात ना, ते सर्व खऱ्या प्रेमासाठी रडत

नाहीत, स्वार्थासाठी रडतात. म्हणजे हे प्रेमच नाही, ही सर्व तर आसक्ती म्हटली जाते. स्वार्थामुळे आसक्ती उत्पन्न होते. घरात सर्वांसोबत चढ-उतार नसलेले प्रेम ठेवावे. पण त्यांना मात्र असेच सांगावे की, 'तुमच्याशिवाय आम्हाला करमत नाही?' व्यवहाराने तर बोलावे लागते ना! परंतु प्रेम तर चढ-उतार नसलेले असावे.

या संसारात जर कोणी म्हणेल, 'की बायकोचे प्रेम हे प्रेम नाही का?' तेव्हा मी त्याला समजावतो की, जे प्रेम कमी-जास्त होत असेल ते प्रेमच नाही. तुम्ही हिऱ्याच्या कुड्या आणून देता त्यादिवशी प्रेम खूप वाढते आणि जर कुड्या आणल्या नाहीत तर प्रेम कमी होते. याला प्रेम म्हटले जात नाही.

**प्रश्नकर्ता :** खरे प्रेम कमी-जास्त होत नाही, मग त्याचे स्वरूप कसे असते?

**दादाश्री :** ते कमी-जास्त होत नाही. जेव्हा बघाल तेव्हा प्रेम तसेच्या तसेच दिसते. हे तर तुमचे काम करून देतो तोपर्यंत प्रेम राहते, आणि काम केले नाही की प्रेम तुटते. त्याला प्रेम म्हणूच कसे शकतो?

म्हणून खऱ्या प्रेमाची व्याख्या काय? तर फुल-हार घालणारे आणि शिव्या देणारे, या दोघांवर सारखेच प्रेम असेल, त्याचे नाव प्रेम. बाकी सर्व आसक्ती. म्हणजे ही प्रेमाची डेफिनेशन सांगतो की प्रेम असे असायला हवे. हेच परमात्म प्रेम आहे, आणि जर असे प्रेम उत्पन्न झाले, तर आणखी कशाची गरजच उरणार नाही. प्रेमाचीच किंमत आहे!

## मोह असलेले प्रेम, बेकार

**प्रश्नकर्ता :** मनुष्य प्रेमाशिवाय जगू शकतो का?

**दादाश्री :** ज्याच्यावर प्रेम केले त्याने घटस्फोट घेतला, मग तो कसा जगेल? आता का बोलत नाही? बोला ना?

**प्रश्नकर्ता :** खरे प्रेम असेल तर जगू शकतो? जर मोह असेल तर नाही जगू शकणार?

**दादाश्री :** हे बरोबर बोललात. आपण प्रेम करतो आणि तो घटस्फोट घेईल, तर जळल मेलं ते प्रेम! त्याला प्रेम म्हणायचेच कसे? आपले प्रेम कधीही तुटणार नाही असे असायला हवे, मग काहीही झाले तरी प्रेम तुटणार नाही. अर्थात खरे प्रेम असेल तर जगू शकतो.

**प्रश्नकर्ता :** फक्त मोहच असेल तर नाही जगू शकणार.

**दादाश्री :** मोहाचे प्रेम तर बेकार आहे. तेव्हा अशा प्रेमात फसू नका. व्याख्येनुसार प्रेम असायला हवे. प्रेमाशिवाय मनुष्य जगू शकत नाही, ही गोष्ट खरी आहे परंतु प्रेम व्याख्येनुसार असायला हवे.

प्रेमाची व्याख्या आपल्या लक्षात आली ना? मग तसे प्रेम शोधा. आता असे प्रेम शोधू नका की लगेच दुसऱ्या दिवशी घटस्फोट घेतील. यांचा काय भरवसा?

**प्रश्नकर्ता :** प्रेम आणि मोह, त्यात मोहात समर्पित होण्यात मोबदल्याची अपेक्षा आहे आणि या प्रेमात मोबदल्याची अपेक्षा नसते, मग प्रेमात समर्पित झाला तर तो पूर्ण पदास प्राप्त करू शकतो?

**दादाश्री :** या जगात जर कोणत्याही व्यक्तीने सत्य (खऱ्या) प्रेमाची सुरुवात केली तर तो परमेश्वर होईल. त्या प्रेमात भेसळ नसते. त्या खऱ्या प्रेमात विषय विकार नसतो, लोभ नसतो, मान नसतो, असे निर्भेळ प्रेम त्याला परमेश्वर बनवतो. संपूर्ण बनवतो. मार्ग तर सर्व सोपे आहेत, परंतु असे होणे कठीण आहे ना!

**प्रश्नकर्ता :** त्याचप्रमाणे जर कोणत्याही मोहामागे जीवन समर्पित करण्याची शक्ती मिळवली तर परिणाम स्वरूप त्याला पूर्णता प्राप्त होते? तर तो ध्येय पूर्ण करु शकतो?

**दादाश्री :** जर मोहासाठी समर्पित केले तर मग मोहच प्राप्त करेल ना, आणि मोहच प्राप्त केला आहे ना लोकांनी!

**प्रश्नकर्ता :** आत्ताच्या काळात ही जी मुले-मुली प्रेम करतात ते मोहाने करतात, म्हणून फेल (नापास) होतात?

**दादाश्री :** केवळ मोहच! वरून चेहरा सुंदर दिसतो, म्हणून प्रेम दिसते. पण ते प्रेम म्हटले जात नाही ना! आता इथे जर एखादे गळू झाले, तर जवळ देखील जाणार नाही. हे तर आंबा चाखून पाहिला तर कळेल. तोंड खराब झाले तर झाले पण महिनाभर खाणेही चांगले वाटत नाही. वर्षभर तोंडावर गळू झाले ना तर तोंड सुद्धा पाहणार नाही, मोह सुटून जाईल. आणि जर खरे प्रेम असेल तर एक काय दोन गळू झाले, तरीही प्रेम सुटणार नाही. म्हणजे असे प्रेम शोधून काढा, नाही तर लग्नच करू नका, केलेत तर फसाल. मग ती जेव्हा तोंड फुगवेल तेव्हा म्हणाल, 'मला तर हिचे तोंडच बघावेसे वाटत नाही.' अरे तोंड चांगले वाटले होते म्हणून तर तू तिला पसंत केलेस आणि आता पसंत नाही म्हणतोस? गोड गोड बोललात तर आवडते. आणि कडू बोलाल तर म्हणेल, 'मला तू अजिबात आवडत नाही.'

**प्रश्नकर्ता :** ती सुद्धा आसक्तीच म्हणायची ना?

**दादाश्री :** सर्व आसक्तीच. 'आधी पसंत होते आणि आता पसंत नाही, आधी पसंत होते आणि आता पसंत नाही' अशी कुरकुर करत राहतो. अशा प्रेमाचा काय उपयोग?

## मोहात दगा-फटका

खूप मार खातो तेव्हा जो मोह होता ना, तो मोह सुटतो. केवळ मोहच होता. मोहाचाच मार खात राहिला.

**प्रश्नकर्ता :** मोह आणि प्रेम या दोघांमधील भेदरेषा काय आहे?

**दादाश्री :** हा काजवा आहे ना, तो दिव्याभोवती फिरून स्वाहा होतो ना? तो स्वत:चे जीवन संपवून टाकतो, यास मोह म्हटले जाते. पण प्रेम तर टिकते, प्रेम टिकाऊ असते, मोह टिकत नाही.

मोह म्हणजे युजलेस (निरूपयोगी) जीवन. ते तर आंधळे होण्यासारखेच आहे. जसे आंधळा माणूस काजव्यासारखा फिरत असतो आणि मार खातो तसेच, आणि प्रेम तर टिकाऊ असते, प्रेमात तर

आयुष्यभरासाठी सुख हवे असते. तात्पुरतचे सुख शोधावे असे नाही ना!

म्हणजे हा सर्व मोहच आहे ना! मोह म्हणजे उघड-उघड दगा-फटका. मोह म्हणजे शंभर टक्के धोकाच.

**प्रश्नकर्ता :** परंतु हा मोह आहे आणि हे प्रेम आहे असे सामान्य व्यक्तीला कसे समजणार? एखाद्या व्यक्तीचे खरे प्रेम आहे की, तो त्याचा मोह आहे हे सामान्य व्यक्तीला कसे समजणार?

**दादाश्री :** ते तर त्याला खडसावल्यावर आपोआपच कळते. एखाद्या दिवशी त्याला खडसावले आणि तो जर चिडला तर कळते ना की हे युजलेस आहे. मग काय दशा होईल? त्यापेक्षा आधीच खडसावून पाहावे. रुपया असा खणखणून पाहतो ना, खरा आहे की, खोटा आहे ते लगेच कळते ना? काही तरी बहाणा करून त्याला खडसावे. आता तर निव्वळ भयंकर स्वार्थ! स्वार्थासाठी सुद्धा प्रेम दाखवतात. पण कधीतरी खडसावून पाहिले तर समजेल की हे खरे प्रेम आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** खरे प्रेम असेल तर खडसावल्यावर कसे असते?

**दादाश्री :** समोरच्याने खडसावले तरी स्वत: शांत राहून त्याला नुकसान होणार नाही असे वागतो. खरे प्रेम असेल तर सर्व गिळून टाकतो. पक्का बदमाश जरी असेल तरी पण तो गप्प बसतो.

## ते प्रेम की लफडे?

**प्रश्नकर्ता :** दोन प्रेमी असतील आणि घरच्यांची समंती नसेल तर, आत्महत्या करतात, असे बऱ्याचदा घडते. तर ते जे प्रेम आहे, त्यास कुठले प्रेम म्हटले जाईल?

**दादाश्री :** उथळ प्रेम! त्यास प्रेमच कसे म्हणता येईल? इमोशनल होतात आणि रुळावर झोपतात! आणि म्हणतात, 'पुढच्या जन्मी आम्ही दोघे सोबतच असू.' तर अशी आशा कोणीही बाळगू नये. ते त्यांच्या कर्माच्या हिशोबानुसार जन्म घेतात. पुन्हा कधी भेटतही नाहीत!!

**प्रश्नकर्ता :** पुन्हा भेटण्याची इच्छा असेल तरीही भेटत नाहीत?

**दादाश्री :** इच्छा ठेवल्याने काही निष्पन्न होते का? पुढचा जन्म तर कर्माचे फळ आहे ना, आणि हा तर इमोशनलपणा (भावनिकता) आहे.

तुम्ही तरुण असताना असे काही लफडे केलेले का? जेव्हा संयोगिक पुरावे एकत्र होतात, सर्व एविडन्स एकत्र होतात तेव्हा असे लफडे चिकटते.

**प्रश्नकर्ता :** लफडे म्हणजे काय?

**दादाश्री :** हो, ते मी सांगतो, एक नागर ब्राम्हण होता, तो एक ऑफिसर होता. तो त्याच्या मुलाला म्हणतो, 'तू फिरत होतास ते मी पाहिले. तू लफडे सोबत घेऊन कशाला फिरतोस?' तो मुलगा कॉलेजमध्ये शिकत होता आणि त्याला गर्लफ्रेंड (मुली) बरोबर फिरताना वडिलांनी पाहिले. हल्लीचे लोक त्यास लफडे म्हणत नाहीत परंतु जुन्या काळातील लोक त्यास लफडे म्हणत. तर वडिलांना असे वाटले की 'या मुलाला प्रेम म्हणजे काय ते समजत नाही, प्रेम काय ते समजत नाही म्हणून मार खाणार. हे लफडे चिकटले आहे, म्हणून त्याला पुष्कळ दु:खं सोसावे लागेल.' प्रेम निभावणे इतके सोपे नाही, प्रेम करणे सर्वांना येते पण त्यास निभावणे सोपे नाही, म्हणून त्याच्या वडिलांनी सांगितले, 'की हे लफडे कशाला उभे केलेस?'

त्यावर तो मुलगा म्हणतो, 'बाबा, हे तुम्ही काय बोलताय?' ती तर माझी गर्लफ्रेंड आहे. तुम्ही तिला लफडे म्हणता? माझे नाक कापले जाईल असे कसे बोलता? असे बोलू नका ना.' तेव्हा वडील म्हणाले ' बरं, आता नाही बोलणार.' त्या गर्लफ्रेंडबरोबर दोन वर्ष मैत्री चालली. मग एकदा ती मुलगी दुसऱ्या एका मुलासोबत सिनेमा पाहायला आली होती आणि ते त्या मुलाने पाहिले. तेव्हा त्याच्या लक्षात आले की हे तर माझे वडील जे सांगत होते की हे लफडे आहे, तर खरोखर हे लफडेच आहे.

म्हणजेच पुरावे (घटक-परिस्थिती) एकत्र आले की, लफडे चिकटते. मग ते सुटत नाही, आणि ती मुलगी आता दुसऱ्यासोबत फिरते

म्हणून रात्रंदिवस त्या मुलाला झोपही लागत नाही. असे घडते की नाही? त्या मुलाने जेव्हा हे जाणले की हे तर लफडेच आहे, माझे वडील सांगत होते ती खरीच गोष्ट आहे, तेव्हापासून ते लफडे सुटत गेले. म्हणजे जोपर्यंत तिला गर्लफ्रेंड म्हणेल आणि हे लफडे आहे असे त्याला वाटत नाही, तोपर्यंत कसे सुटेल?!

**प्रश्नकर्ता :** तर मग हा मोह आहे आणि हे प्रेम आहे याचा निर्णय करायचा असेल तर तो कसा करता येईल?

**दादाश्री :** प्रेम नाहीच मुळी, मग प्रेमाच्या गोष्टी कशाला करता? हे प्रेम नाहीच, हा सर्व मोहच आहे. मोह! मूर्छित होतो. बेभान, बिलकुल भान नाही.

## सिन्सियारिटी तिथे खरे प्रेम!

समोरच्याकडून जरी कितीही नियम तोडले गेले, एकमेकांना दिलेले वचन हवे तितके तोडले, तरी सुद्धा सिन्सियारिटी जात नाही, सिन्सियारिटी फक्त वर्तनातूनच नाही, तर डोळ्यातून सुद्धा जाता कामा नये, तेव्हा समजावे की इथे प्रेम आहे. म्हणजे असे प्रेम शोधा. बाहेर जे चालले आहे त्यास प्रेम मानू नका. बाहेर जे चालले आहे ते सर्व बाजारू प्रेम-आसक्ती आहे, त्यामुळे विनाश होईल. पण तरी त्यातून सुटका नाही, त्यासाठी मी तुम्हाला मार्ग दाखवेल. आसक्तीत पडल्याशिवाय तर सुटकाच नाही ना!

## भगवत् प्रेमाची प्राप्ती

**प्रश्नकर्ता :** मग ईश्वराचे परम, पवित्र, प्रबळ प्रेम संपादन करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** तुम्हाला परमेश्वराचे प्रेम प्राप्त करायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** हो, करायचे आहे. शेवटी प्रत्येक मनुष्याचे ध्येय हेच आहे ना? माझा प्रश्न हाच आहे की, परमेश्वराचे प्रेम कसे संपादन करावे?

**दादाश्री :** प्रेम तर सर्वांनाच करायचे असते, पण गोड लागले तरच

प्रेम करेल ना? तसे तुम्हाला परमेश्वर कुठे आणि कसा गोड लागला, ते मला सांगा ना!

**प्रश्नकर्ता :** कारण हा जीव अंतिम क्षणी जेव्हा देह सोडतो तेव्हा सुद्धा परमेश्वराचे नाव घेऊ शकत नाही.

**दादाश्री :** पण परमेश्वराचे नाव कसे घेऊ शकेल? त्याला ज्यात रुची असेल त्याचे नाव तो घेऊ शकेल. जिथे रुची असते तिथे त्याची रमणता असते. परमेश्वरात रुचीच नाही म्हणून परमेश्वरात रमणता देखील नाही. जेव्हा भीती वाटते तेव्हा परमेश्वराची आठवण येते.

**प्रश्नकर्ता :** परमेश्वरामध्ये रुची तर असते. पण तरी काही आवरणं अशी बांधली जातात की ज्यामुळे परमेश्वराचे नाव घेऊ शकत नसतील.

**दादाश्री :** पण परमेश्वरावर प्रेम बसल्याशिवाय तो नाव कसे घेणार? परमेश्वरावर प्रेम बसायला हवे ना? आणि परमेश्वरावर अधिक प्रेम केले तर त्याचा काय फायदा? मला असे म्हणायचे आहे की, आंबा जर गोड असेल तर प्रेम होते आणि कडू किंवा आंबट लागला तर? तसेच परमेश्वर तुम्हाला कुठे गोड लागला की तुमचे त्याच्यावर प्रेम बसेल?

असे आहे, जीवमात्रात परमेश्वर बसलेले आहेत. चैतन्यरुपात आहेत, की जे चैतन्य जगाच्या जाणीवेतही नाही आणि जे चैतन्य नाही, त्यालाच चैतन्य मानतात. या शरीरात जो भाग चैतन्य नाही त्याला चैतन्य मानतात आणि जे चैतन्य आहे ते त्याच्या जाणीवेतच नाही, त्याचे भानच नाही. आता तो शुद्ध चैतन्य अर्थात शुद्धात्मा आणि तोच परमेश्वर आहे, त्याचे नाव केव्हा स्मरणात येईल? तर जेव्हा आपल्याला त्यांच्याकडून काही लाभ झाला असेल तरच त्यांच्यावर प्रेम बसेल. ज्याच्यावर प्रेम बसते ना, त्याची आठवण झाली तर त्याचे नाव घेऊ शकतो. म्हणजे आपल्याला प्रेम वाटेल असे जर कोणी भेटले तर ते नेहमीच आपल्या आठवणीत राहतात. तुम्हाला 'दादा' आठवतात?

**प्रश्नकर्ता :** होय.

**दादाश्री :** हो. त्यांचे प्रेम आहे तुमच्यावर म्हणून आठवतात. आता

प्रेम का जडले? कारण 'दादा' नी काहीतरी सुख दिले आहे की ज्यामुळे प्रेम जडले, आणि ते प्रेम जडले की मग कधीच त्यांचा विसर पडत नाही ना! त्यांना कधी आठवावे लागतच नाही.

म्हणजे परमेश्वराची आठवण केव्हा येते? तर परमेश्वर जेव्हा आपल्यावर काही कृपा करतील. आपल्याला काहीतरी सुख देतील, तेव्हा त्यांची आठवण येते. एक माणूस मला म्हणतो की, 'मला माझ्या पत्नीशिवाय करमतच नाही.' अरे, असे का? मग पत्नी नसेल तर काय होईल?

तेव्हा तो म्हणाला, 'मग तर मी मरूनच जाईन. अरे पण कशाला?' तेव्हा म्हणतो, 'ही पत्नीच तर मला सुख देते.' आणि जर ती सुख देत नसेल, मार-झोड करत असेल तर?' तरीही त्याला आठवते. अर्थात राग आणि द्वेष दोन्हीत आठवण येत राहते.

## पशू-पक्ष्यात देखील प्रेम

म्हणजे हे सर्व समजून घ्यावे लागेल ना. तुम्हाला आता असे वाटते की, प्रेमासारखी वस्तू आहे का या संसारात?

**प्रश्नकर्ता :** आता तर, मुलांवर प्रेम करतो, त्यालाच आम्ही प्रेम मानतो ना!

**दादाश्री :** असे होय? प्रेम तर या चिमणीचे तिच्या पिल्लांवरही असते. चिमणी जेव्हा बाहेरुन दाणे आणून घरट्यात येते, तेव्हा पिल्ले 'आई आली, आई आली' असे नाचू लागतात. मग चिमणी त्या पिल्लांच्या तोंडात दाणे भरवते. ती स्वत:च्या तोंडात किती दाणे भरून ठेवत असेल? आणि एक-एक दाणा तोंडातून कसा काढत असेल?' या विचारात मी होतो. ती चारही पिल्लांच्या तोंडात एक-एक दाणा भरवते.

**प्रश्नकर्ता :** पण त्यांच्यात आसक्ती कशी येईल? त्यांच्यात तर बुद्धी नाही ना?

**दादाश्री :** हो, तेच तर मी म्हणतोय ना? म्हणजे हे तर मी

पाहण्यासाठी सांगतोय. खरोखर तर ते प्रेम मानले जात नाही. प्रेम समजदारीपूर्वक असायला हवे. परंतु ते सुद्धा प्रेम मानले जात नाही, पण तरी देखील या दोघांतील भेद समजण्यासाठी आपण हे उदाहरण देत आहोत. आपल्याकडे लोक असे नाही का म्हणत की भाऊ, या गाईची आपल्या वासरावर किती माया आहे? तुम्हाला समजले ना? त्यांना बदल्यात काही मिळवण्याची अपेक्षा नसते ना?

## मोबदल्याची अपेक्षा, तिथे आसक्ती

म्हणजे आसक्ती कुठे असते? तर जिथे समोरच्याकडून काही मोबदल्याची अपेक्षा असेल, तिथे आसक्ती असते. मोबदल्याची अपेक्षा नसेल असे किती लोक असतील हिंदुस्तानात?

आपले लोक आंब्याचे झाड लावतात ना, ते काय फक्त लावण्यासाठीच लावतात? 'भाऊ, आंब्याच्या झाडासाठी एवढे कष्ट का घेता?' तेव्हा म्हणे, 'झाड मोठे होईल ना, तेव्हा माझ्या मुलांची मुले आंबे खातील आणि आधी तर मीच खाईन, म्हणजे फळाच्या अपेक्षेने आंब्याचे झाड वाढवतो. तुम्हाला काय वाटते? की तो निष्काम वाढवतो?' निष्काम कोणी वाढवतच नाही? म्हणजे सर्वजण स्वत:ची *चाकरी* (सेवा)करवून घेण्यासाठी मुलांना वाढवत असतील ना, की भाकरी करण्यासाठी (दु:ख भोगण्यासाठी)?

**प्रश्नकर्ता :** सेवा-*चाकरी* करविण्यासाठी.

**दादाश्री :** परंतु आजकाल तर भाकरीच करुन टाकतात. मला एक गृहस्थ म्हणाले ' माझा मुलगा माझी सेवा-*चाकरी* करत नाही.' तेव्हा मी म्हणालो मग आता भाकरी नाही करणार तर काय करणार? लाडू बनतील असे तर तुम्ही नाहीत. म्हणून भाकरी केली की निपटारा(!) होईल.

## आईचे प्रेम

**प्रश्नकर्ता :** शास्त्रात असे लिहिले आहे की, आई-वडिलांना स्वत:च्या मुलांवर एकसमान प्रेम असते. तर हे बरोबर आहे?

**दादाश्री :** नाही, आई-वडील काही देव नाहीत, की त्यांचे एकसमान प्रेम असेल. तसे एकसमान प्रेम तर देवच ठेवू शकतो. आई-वडील देव नाहीत बिचारे, ते तर आई-वडील आहेत. तेव्हा ते पक्षपाती असणारच. एकसमान प्रेम तर देवच करू शकतो. दुसरे कोणीच करू शकत नाही. माझे सर्वांवर एकसमान प्रेम असते.

बाकी, हे तर लौकिक प्रेम आहे, लोक उगाचच 'प्रेम-प्रेम' गात राहतात. बायकोवर सुद्धा प्रेम असते का? ही सर्व स्वार्थाचीच नाती आहेत. आणि ही आई आहे ना, ती तर मोहानेच जगत असते. स्वतःच्या पोटी जन्मला म्हणून तिला मोह उत्पन्न होतो. गाईला सुद्धा मोह उत्पन्न होतो, परंतु गाईचा मोह सहा महिन्यापर्यं राहतो. आणि या आईचा मोह तर मुलगा साठ वर्षाचा झाला तरीही सुटत नाही.

**प्रश्नकर्ता :** परंतु आईचे बालकावर जे प्रेम असते ते निष्काम प्रेमच असते.

**दादाश्री :** ते निष्काम प्रेम नव्हे. आईचे बालकावर निष्काम प्रेम नसते. मुलगा मोठा झाल्यावर जर म्हणाला की, 'तू तर माझ्या बापाची बायको आहेस.' त्याक्षणी कळेल की, निष्काम प्रेम होते की नाही? मुलगा जेव्हा म्हणतो की,'तुझ्या बापाची बायको आहेस' त्याचक्षणी आईचा मोह ओसरतो. ती म्हणेल, 'तू मला तोंड दाखवू नकोस.' तर आता बापाची बायको म्हणजे आई नाही का? तेव्हा आई म्हणते, 'पण तो असे का बोलला?' तिला सुद्धा गोडवाच हवा असतो. हा सर्व मोहच आहे.

अर्थात ते प्रेम सुद्धा निष्काम नाही. ती मोहाची आसक्तीच आहे. जिथे मोह असतो आणि आसक्ती असते, तिथे निष्कामता नसते. निष्काम मोह तर आसक्तीरहित असतो.

**प्रश्नकर्ता :** तुमची गोष्ट तर खरी आहे. बाळ मोठा झाल्यावर अशी आसक्ती वाढते. पण बाळ जेव्हा लहान असेल, सहा महिन्याचा बाळ असेल तेव्हा?

**दादाश्री :** तेव्हा सुद्धा आसक्तीच असते. दिवसभर आसक्तीच

असते. जग आसक्तीनेच बांधले गेले आहे. जगात कुठेही प्रेम असू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** वडिलांसाठी हे मान्य आहे, पण आईच्या बाबतीत सुद्धा असे असते हे अजूनही मला पटत नाही.

**दादाश्री :** असे आहे की, वडील स्वार्थी असतात, परंतु आई मुलांच्या बाबतीत स्वार्थी नसते. म्हणजे इतका फरक असतो. आईला काय असते? तर फक्त आसक्तीच! मोह!! बाकी सर्व विसरून जाते, भान विसरून जाते. त्यात क्षणभरही निष्काम होऊ शकत नाही, मनुष्य निष्काम होऊच शकत नाही. 'ज्ञानी' शिवाय इतर कोणी निष्काम होऊच शकत नाही, आणि हे जे सर्व निष्काम होऊन फिरतात ना, ते जगाचा फायदा घेतात. निष्कामचा (खरा) अर्थ तर असायला हवा ना?

## रागावल्यावर कळते?

**प्रश्नकर्ता :** आई-वडिलांचे जे प्रेम आहे, ते कसे म्हटले जाते?

**दादाश्री :** एखाद्या दिवशी मुलाने जर आई-वडिलांना शिव्या दिल्या ना, की मग ते दोघेही मुलाशी भांडतात. हे 'संसारी' प्रेम टिकतच नाही ना. पाच वर्षाने, दहा वर्षाने कधी ना कधी ओसरते. परस्पर प्रेम असायला हवे. कमी-जास्त होणार नाही असे प्रेम असायला हवे.

तरी सुद्धा वडील कधी तरी मुलांवर रागावतात, पण त्यात हिंसक भाव नसतो.

**प्रश्नकर्ता :** खरोखर तर ते प्रेमच आहे.

**दादाश्री :** ते प्रेम नाहीच. प्रेम असेल तर राग येतच नाही. पण त्यामागे हिंसकभाव नाही, म्हणून त्यास क्रोध म्हणत नाही. क्रोध हिंसकभावासहित असतो.

## व्यवहारात आईचे प्रेम उत्कृष्ट

खरे प्रेम तर कोणत्याही परिस्थितीत तुटायला नको. प्रेम त्यास

म्हणायचे की जे कधी तुटत नाही. हीच तर प्रेमाची कसोटी आहे. पण तरी थोडेफार प्रेम आहे ते म्हणजे आईचे प्रेम.

**प्रश्नकर्ता :** आपण असे म्हणालात की, आईचे प्रेम असू शकते, वडिलांचे नाही. तर यांना वाईट नाही का वाटणार?

**दादाश्री :** पण तरी आईचे प्रेम आहे. याची खात्री पटते. आई मुलाला पाहताच खुश. याचे काय कारण? तर मुलाने आपल्या घरातच, आपल्या शरीरातच नऊ महिने मुक्काम केला होता. त्यामुळे आईला असे वाटते की हा माझ्या पोटी जन्मला आहे आणि त्या मुलालाही असे वाटते की, मी आईच्या पोटी जन्मलो. म्हणून इतकी एकता झाली आहे. आईने जे खाल्ले त्याचेच रक्त बनते. म्हणजे हे एकतेचे प्रेम आहे. पण तरी सुद्धा वास्तविक, 'रियली स्पिकिंग' प्रेम नाही. 'रिलेटिव्हली स्पिकिंग' प्रेम आहे. त्यामुळे प्रेम जर कुठे असेल तर ते फक्त आई वरच. तिथे प्रेमाची काही तरी निशाणी दिसते. ते देखील पौद्‌गलिक (शारीरिक) प्रेम आहे, आणि प्रेम पण केवढ्या भागात? तर एखादी वस्तू आईला आवडत असेल आणि त्या वस्तूवर मुलाने हक्क बजावला तर ते दोघेही भांडतात, तेव्हा प्रेम फ्रॅक्चर होते. मुलगा वेगळा राहायला जातो. म्हणेल, 'आई, तुझ्याशी जमणार नाही.'

हे रिलेटिव्ह नाते आहे. रियल नाते नाही. खरे प्रेम असेल ना, तर वडील मेल्यावर वीस वर्षाचा मुलगा सुद्धा त्यांच्यासोबत जाईल. त्यास प्रेम म्हणतात. एक तरी मुलगा सोबत जातो का?

**प्रश्नकर्ता :** कोणीही गेला नाही.

**दादाश्री :** अपवाद नाही का कोणी? जेव्हा वडील मरतात तेव्हा मुलगा, 'माझे वडील गेले, माझे वडील गेले,' याचा एवढा परिणाम होतो की तो देखील वडिलांसोबत मरण्यास तयार होतो. अशी घटना मुंबईत घडली आहे का कधी?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** मग तिथे स्मशानात जाऊन काय करतात?

**प्रश्नकर्ता :** अग्नी देतात.

**दादाश्री :** असे होय? मग घरी येऊन काही खात नसेल नाही का? खातो ना! तर हे असे आहे, औपचारिकता आहे, सर्वांना माहीत आहे की हे रिलेटिव्ह नाते आहे. गेला तो गेला. मग घरी येऊन आरामात खातात.

**प्रश्नकर्ता :** मग एखादी व्यक्ती मेली तर आपण त्याच्यासाठी मोहामुळे रडतो की शुद्ध प्रेम असते म्हणून रडतो?

**दादाश्री :** दुनियेत शुद्ध प्रेम कुठेही नसते. हे सर्व मोहामुळेच रडतात. बिनस्वार्थाची ही दुनिया नाहीच आणि जिथे स्वार्थ आहे तिथे मोह आहे. आई बरोबरही स्वार्थ आहे. लोक असे समजतात की, आई वर शुद्ध प्रेम असते, परंतु स्वार्थाशिवाय तर आई सुद्धा नाही, पण तरी तो लिमिटेड स्वार्थ आहे, म्हणून त्याची प्रशंसा केली आहे, कमीत कमी-मर्यादित स्वार्थ आहे. शेवटी तर हा सुद्धा मोहाचाच परिणाम आहे.

**प्रश्नकर्ता :** ते ठीक आहे, परंतु आईचे प्रेम तर नि:स्वार्थ असू शकते ना?

**दादाश्री :** बहुतांशी नि:स्वार्थच असते. म्हणून तर आईच्या प्रेमाला प्रेम म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** तरी देखील आपण त्यास 'मोह आहे' असे का म्हणता?

**दादाश्री :** असे आहे, कोणी म्हणेल की, 'भाऊ, प्रेमासारखी वस्तू या दुनियेत नाहीच?' तर पुरावा म्हणून दाखवायचे असेल तर ते आईचे प्रेम हे प्रेम आहे. असे दाखवू शकतो की इथे काही अंशी प्रेम आहे. बाकी दुसऱ्या गोष्टीत काही तथ्य नाही. मुलावर आईचे प्रेम असते, आणि आता इतर सर्व प्रेमापेक्षा ह्या प्रेमाची अधिक प्रशंसा करण्यासारखे आहे. कारण त्या प्रेमात बलिदान आहे.'

**प्रश्नकर्ता :** आईच्या प्रेमाची वस्तुस्थिती अशी आहे, तर मग वडिलांचा काय वाटा आहे, या प्रेमात...

**दादाश्री :** वडिलांचे मतलबी प्रेम. 'माझे नाव उजळवेल असा आहे,' असे म्हणतील. फक्त आईचेच थोडेसे प्रेम, ते पण थोडेसेच. तिच्याही मनात असते की, मोठा होईल, माझी सेवा करेल, आणि श्राद्ध केले तरी खूप झाले. अशी एक लालूच आहे, म्हणजे जिथे कुठलीही लालूच असेल तिथे प्रेम नाही. प्रेम ही वस्तूच वेगळी आहे, आत्ता तुम्ही आमचे प्रेम पाहत आहात पण ते जर तुमच्या लक्षात आले तर. या जगातील कोणतीही वस्तू मला नकोच. तुम्ही लाखो डॉलर द्याल किंवा लाखो पौंड द्याल! जगभराचे सोने द्याल तरी ते माझ्या उपयोगाचे नाही. जगातील स्त्रीसंबंधी विचार सुद्धा येत नाही. मी ह्या शरीरापासून वेगळा राहतो. शेजाऱ्यासारखा राहतो. ह्या शरीरापासून वेगळा, शेजारी. 'फर्स्ट नेबर.'

## प्रेम सामावले नॉर्मालिटीत

आई हे देवीचे स्वरूप आहे. आपण देवीला मानतो ना, ते आईचे स्वरूप आहे. आईचे प्रेम खरे आहे, परंतु ते प्राकृत प्रेम आहे, आणि दुसरे म्हणजे भगवंताचे प्रेम असे असते. ज्यांनाही इथे भगवंत मानत असतील तिथे आपण पडताळून पाहिले पाहिजे. तिथे काही उलट केले किंवा उलट बोललो तरीही ते प्रेम करतात आणि खूप फुले वाहिली तरी देखील तसेच प्रेम करतात. घटत नाही, वाढत नाही, असे ते प्रेम असते. म्हणून त्यास प्रेम म्हटले जाते, आणि ते प्रेम स्वरूप, तेच परमात्म स्वरूप आहे.

बाकी, जगाने खरे प्रेम पाहिलेच नाही. महावीर भगवंत गेल्यानंतर प्रेम शब्दच पाहिला नाही. सर्व आसक्तीच आहे. या संसारात प्रेम शब्दाचा उपयोग आसक्तीसाठीच केला जातो. प्रेम जर त्याच्या लेव्हलमध्ये असेल, नॉर्मालिटीत असेल तोपर्यंत ते प्रेम म्हटले जाते आणि नॉर्मालिटी सोडतो तेव्हा त्या प्रेमास आसक्ती म्हटली जाते. आईचे प्रेम त्यास प्रेम अवश्य म्हटले जाते पण जेव्हा नॉर्मालिटी सुटते तेव्हा आसक्ती म्हटली जाते. बाकी, प्रेम हेच परमात्म स्वरूप आहे. नॉर्मल प्रेम परमात्मा स्वरूप आहे.

## गुरु-शिष्याचे प्रेम

शुद्ध प्रेमाने सर्व दरवाजे उघडतात. गुरूच्या प्रेमाने काय प्राप्त होत

नाही? खरे गुरु आणि शिष्यामध्ये तर प्रेमाचे बंधन इतके सुंदर असते की, गुरु जे काही बोलतात ते शिष्याला खूपच आवडते. असा तर त्यांच्या प्रेमाचा बंध असतो. परंतु आजकाल तर या दोघांतही भांडणे होत असतात.

एका ठिकाणी तर शिष्य आणि गुरु महाराज दोघेही मारामारी करत होते. तेव्हा एका माणसाने मला सांगितले, 'चला वर' मी म्हटले 'अरे बाबा, असे पाहू नये' वाईट दिसते. असे तर चालायचेच. जग असेच आहे. सासू-सून नाही का भांडत? तसेच हे सुद्धा आहे. वैर बांधलेले, ते वैर पूर्ण होत असते. वैर बांधले गेले असते. हे जग जर प्रेमाचे असते तर सबंध दिवस त्यांच्याजवळून उठावेसे वाटणार नाही. लाख रुपयांची कमाई होत असेल तरी म्हणेल जाऊ द्या ना! आणि हा बापडा तर काही कमाई होत नसेल तरी बाहेर निघून जातो! बाहेर का निघून जातो? कारण त्याला घरात आवडत नाही, चैन पडत नाही!

## पती? नाही, 'कम्पेनियन'

या सर्व 'रॉंग बिलिफ्स (चुकीच्या मान्यता)' आहेत. 'मी चंदुभाई आहे.' ही रॉंग बिलिफ आहे. मग घरी गेल्यावर आपण त्याला विचारू 'हे कोण?' तेव्हा म्हणेल, 'मला नाही ओळखले' मी हिचा मालक (पती). ओहोहो... मोठे आले मालक! जणू या मालकाचा कोणी मालकच नसेल अशी गोष्ट करतो ना? या मालकाचाही कोणीतरी मालक तर असेलच ना! मग त्या वरच्या मालकाची आपण पत्नी झालो आणि आपली पत्नी ही झाली. हे कसल्या भानगडीत पडलात? मालक व्हायचेच कशाला? माझे 'कम्पेनियन' (जोडीदार) आहे असेच म्हणावे, मग काय हरकत आहे?

**प्रश्नकर्ता :** दादाजी ही तर आपण खूप 'मॉडर्न' भाषा वापरली.

**दादाश्री :** मग काय? टसल (संघर्ष) कमी होईल ना! हो, एकाच खोलीत 'कम्पेनियन' आणि ते, दोघे राहत असतील, तर त्यातली एक व्यक्ती चहा बनवेल तर दुसरी व्यक्ती चहा पिणार, मग दुसरी व्यक्ती त्याच्यासाठी दुसरे काही काम करेल. असे करत 'कम्पेनियनशीप' चालत राहील.

**प्रश्नकर्ता :** 'कम्पेनियन' मध्ये आसक्ती असते की नाही?

**दादाश्री :** हो, त्यातही आसक्ती असते, पण ती आसक्ती यांच्यासारखी नसते. यांचे तर शब्दच फार आसक्तीवाले! शब्द गाढ आसक्तीवाले असतात. 'मालक आणि मालकीण' (पती आणि पत्नी) या शब्दातच इतकी गाढ आसक्ती आहे. आणि 'कम्पेनियन' म्हटले तर आसक्ती कमी होते.

## माझी नाही...

एका माणसाची बायको वीस वर्षापूर्वी वारली होती, तर दुसऱ्या एका व्यक्तीने मला सांगितले की 'या काकांना मी रडवू?' मी म्हणालो, 'कसे रडवणार?' या वयात तर ते रडणार नाहीत, त्यावर तो म्हणाला 'पाहा तरी, ते कसे सेन्सिटिव्ह (भावूक) आहेत!' मग तो पुतण्या बोलला, 'काका, काकींची तर गोष्टच विचारू नका, किती चांगला त्यांचा स्वभाव!' तो असे बोलत होता तेवढ्यात तर काका खरोखरच रडायला लागले. अरे, काय हा वेडेपणा! साठाव्या वर्षी सुद्धा बायकोसाठी रडायला येते? कसली ही माणसे? हे लोक तर सिनेमात देखील रडतात ना? सिनेमात कोणी मेला तर पाहणारा सुद्धा रडायला लागतो.

**प्रश्नकर्ता :** पण मग ती आसक्ती सुटत का नाही?

**दादाश्री :** आसक्ती तर सुटत नाही, 'माझी, माझी' करून केले आहे, तर आता 'माझी नाही', 'माझी नाही' असा जप केल्याने बंद होईल. हे तर जे आटे फिरवले आहेत, ते आता उलगडावेच लागतील ना!

## मतभेद वाढतात, तसतसे प्रेम वाढते

पत्नीशी मतभेद होतात की नाही होत?

**प्रश्नकर्ता :** मतभेदाशिवाय तर पती-पत्नी म्हटलेच जात नाहीत ना?

**दादाश्री :** हो, का? असे आहे? असा नियमच असेल? पुस्तकात असा नियम लिहिलेला असेल की मतभेद झाले तरच त्यांना पती-पत्नी म्हणायचे? मतभेद कमी-जास्त होतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो. कमी-जास्त होतात.

**दादाश्री :** तर मग पती आणि पत्नी, हेही कमी होत जाते, नाही का?

**प्रश्नकर्ता :** नाही, उलट प्रेम वाढत जाते.

**दादाश्री :** प्रेम वाढत जाते तसतसे मतभेद कमी होत जातात, नाही का?

**प्रश्नकर्ता :** जितके मतभेद वाढत जातात, जितके वाद वाढत जातात, तितके प्रेमही वाढत जाते.

**दादाश्री :** हो, ते प्रेम वाढत नाही, ती आसक्ती वाढते. प्रेम तर जगाने पाहिलेच नाही. प्रेम हा शब्द जगाने कधी पाहिलाच नाही. ही सर्व आसक्तीच आहे. प्रेमाचे स्वरूप वेगळ्याच प्रकारचे आहे. आता तुम्ही माझ्याबरोबर बोलत आहात ना, तर तुम्ही इथे प्रेम पाहू शकता, तुम्ही मला झिडकारले तरी सुद्धा तुमच्यावर माझे प्रेमच असेल. तेव्हा तुम्हाला समजेल की ओहोहो! प्रेम स्वरूप असे असतात. ही गोष्ट ऐकण्यात काही फायदा आहे का?

**प्रश्नकर्ता :** पुरेपूर फायदा आहे.

**दादाश्री :** हो, सावधान व्हा. नाही तर मूर्ख बनलात समजा. आणि प्रेम असेल का? तुमच्यात तरी प्रेम आहे का, की त्यांच्यात असेल? आपल्यात प्रेम असेल तर समोरच्यात प्रेम असेल. आपल्यात प्रेम नाही आणि समोरच्यात प्रेम शोधतो की 'मला तुमच्यात प्रेम दिसत नाही.' मूर्खा, प्रेम शोधतोस? तो प्रेमी नव्हे! हा तर प्रेम शोधतो. सावध हो, हल्ली प्रेम असेल का कुठे? जो ज्याच्या तावडीत सापडतो त्याला तो भोगतो, लुटबाजी करतो.

## यात प्रेम कुठे राहिले?

पती आणि पत्नीच्या प्रेमात पती जर कमावत नसेल तेव्हा दोघांचे प्रेम समजेल. पत्नी काय म्हणेल? 'चुलीत काय तुमचे पाय ठेवू?' पती

कमावत नसेल तर पत्नी असे नाही का बोलत? मग तेव्हा तिचे प्रेम कुठे गेले? प्रेम असेल का या जगात? ही तर आसक्तीच आहे. जर खाण्या-पिण्याचे सर्व व्यवस्थित असेल तर प्रेम (!) दिसते आणि पती बाहेर लफडयात पडला असेल तर ती म्हणेल, 'तुम्ही असे वागाल तर मी घर सोडून निघून जाईल' उलट पत्नीच पतीस असे झिडकारते. तो तर बापडा गुन्हेगार आहे म्हणून गप्प बसतो. मग यात प्रेम करण्यासारखे आहे तरी काय? हे तर कसे-बसे करून संसारगाडे पुढे ढकलायचे. खाण्या-पिण्याचे पत्नी बनवून देईल आणि तुम्ही पैसे कमावून आणायचे. अशाप्रकारे जेमतेम करून चालते मियाँ-बीबीची गाडी!

## आसक्ती तिथे रिॲक्शन सुद्धा

**प्रश्नकर्ता :** परंतु बऱ्याच वेळा आपल्याला द्वेष करायचा नसतो तरी द्वेष होतोच, याचे काय कारण?

**दादाश्री :** कोणाबरोबर?

**प्रश्नकर्ता :** समजा नवऱ्याबरोबर असे झाले तर?

**दादाश्री :** त्यास द्वेष म्हणत नाही. जे आसक्तीचे प्रेम आहे ना ते नेहमीच रिॲक्शनरी असते. म्हणजे ते जर चिडले तर हे त्यांच्याकडे पाठ फिरवतात. पाठ फिरवली की थोडे दिवस एकमेकांपासून दूर राहतात, दूर राहिल्यामुळे परत प्रेम वाढते, प्रेम वाढले की ते प्रेम बोचते तेव्हा पुन्हा वाद होतो, नंतर पुन्हा प्रेम वाढते. म्हणजे जिथे अत्याधिक प्रेम असते तिथेच वाद होत असतात. तेव्हा जिथे वाद होत असतील ना, तिथे त्यांच्यात प्रेम आहे असे समजावे. प्रेम आहे म्हणूनच वाद होतात. हे पूर्व जन्मीचे प्रेम आहे म्हणून वाद होतात. अत्याधिक प्रेम आहे, त्याशिवाय वाद होणारच नाही ना! वादाचे स्वरूपच हे असे आहे.

लोक यास काय म्हणतात? संघर्षामुळेच तर आमचे प्रेम आहे, असे म्हणतात. तेव्हा ही गोष्ट सुद्धा खरीच आहे. ही आसक्ती संघर्षामुळेच तर झाली आहे. जिथे संघर्ष कमी, तिथे आसक्ती नसते. ज्या घरात पती-

पत्नीमध्ये संघर्ष कमी होत असतील तिथे आसक्ती कमी आहे असे समजावे. समजेल अशी गोष्ट आहे ना ही?

**प्रश्नकर्ता :** हो. आणि जास्त आसक्ती असेल तिथे मत्सर पण जास्त असतो ना?

**दादाश्री :** आसक्ती मुळेच तर ही सर्व झंझट होत असते. ज्या घरात नवरा-बायको आपापसात खूप भांडत असतील तर आपण समजावे की इथे आसक्ती जास्त आहे, इतके समजूनच घ्यावे. म्हणून त्यास आम्ही काय म्हणतो? 'भांडतात' असे म्हणत नाही, एकमेकाला चापट मारत असतील तरीही आम्ही 'भांडत आहेत' असे म्हणत नाही? आम्ही त्यास पोपटमस्ती म्हणतो. एक पोपट दुसऱ्या पोपटाला अशी चोच मारतो तेव्हा दुसरा पोपटही त्याला चोच मारतो, एकमेकाला चोच मारतात पण रक्त काढत नाही. हो, ही पोपट मस्ती! तुम्ही पाहिली नाही का अशी पोपट मस्ती?

आता जेव्हा अशी खरी गोष्ट ऐकतो तेव्हा आपल्याला आपल्याच चुकांवर, आपल्या मूर्खपणावर हसू येते. खरी गोष्ट ऐकल्यानंतर मनुष्याला वैराग्य येते की अरे, आपण अशा चुका केल्या? फक्त चुकाच नाही पण दु:खही फार सोसले.

## दोष, आक्षेप तिथे प्रेम असेल?

लोक आसक्तीला प्रेम मानून गोंधळतात. पत्नीला पतीकडे काम आणि पतीला पत्नीकडे काम, हे सर्व कामामुळेच उभे झाले आहे. काम झाले नाही तर आत सर्व बोंबा मारतात, हल्ला करतात.या संसारात एक मिनिट देखील आपले कोणी झालेच नाही. आपले कोणी होतच नाही. हे तर जेव्हा वेळ येईल तेव्हा कळेल. तुम्ही तासभर मुलाला रागवाल तेव्हा कळेल की मुलगा आपला आहे की परका? अरे, कोर्टात केस करायला सुद्धा तयार होईल, मग वडील सुद्धा काय म्हणतील? 'ही माझी स्वत:ची कमाई आहे तुला एक पै देखील देणार नाही' त्यावर मुलगाही म्हणेल 'मी तुम्हाला मारून-झोडून पैसे घेईन. यात आपलेपणा असतो का?' फक्त ज्ञानी पुरुषच आपले होतात.

बाकी, यात प्रेमासारखे काहीच नाही. या संसारात प्रेम शोधूच नका. प्रेम कुठेही नसते. प्रेम तर ज्ञानी पुरुषांजवळ असते. इतर सर्व ठिकाणी तर प्रेम ओसरते आणि मग भांडणे होतात. भांडणे होतात की नाही? याला प्रेम म्हणत नाही. ती सर्व आसक्ती आहे. आसक्तीलाच जगातील लोक प्रेम म्हणतात. वेडेवाकडे बोलणे हाच धंदा! प्रेमाचा परिणाम म्हणजे कधी भांडण होतच नाही. प्रेम त्याचे नाव की कोणाचाही दोष दिसत नाही.

प्रेमात आयुष्यभरात कधीही मुलांचा दोष दिसत नाही, पत्नीचा दोष दिसत नाही, त्यास प्रेम म्हणावे. प्रेमात दोष दिसतच नाहीत आणि इथे तर लोकांना कितीतरी दोष दिसतात? 'तू अशी आणि तू तशी!' अरे, तू प्रेम म्हणत होतास ना? मग कुठे गेले ते प्रेम? म्हणजे हे प्रेमच नाही, दुनियेत कधी प्रेम असते का? एका केसा इकतेही प्रेम जगाने पाहिले नाही. ही तर निव्वळ आसक्तीच आहे.

आणि जिथे आसक्ती असेल तिथे आक्षेप झाल्याशिवाय राहतच नाही, आसक्तीचा हा स्वभावच आहे. आसक्ती झाली म्हणूनच आक्षेप करत राहतात ना, की 'तुम्ही असे आहात, तुम्ही तसे आहात' 'तुम्ही असे आणि तू अशी' असे नाही बोलत, नाही का? तुमच्या गावी असे बोलतात की नाही बोलत? बोलतात!, तर ते आसक्तीमुळे. पण जिथे प्रेम आहे तिथे दोष दिसतच नाहीत.

संसारात या भांडणामुळेच आसक्ती होते. या संसारात भांडण तर आसक्तीचे विटामिन आहे. भांडण नसेल मग तर वीतराग होता येईल.

## प्रेम तर वीतारागींचेच

या मुली नवरा पसंत करतात, सर्व प्रकारे बघून पसंत करतात, नंतर भांडत नसतील? भांडतात का? मग त्यास प्रेम म्हटलेच जाणार नाही ना! प्रेम तर कायमचेच असते. जेव्हा पाहाल तेव्हा तेच प्रेम, तसेच प्रेम दिसते. त्यास म्हणतात प्रेम. आणि तिथे आश्वासन घेता येते.

हे तर तुम्हाला तिच्यावर प्रेम वाटते आणि ती जर कधी रुसून

बसली असेल, तेव्हा जळलं मेलं ते प्रेम! गटारात टाका त्या प्रेमास, तोंड फुगवून बसली असेल तर त्या प्रेमाचा काय उपयोग? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** बरोबर आहे.

**दादाश्री :** कधीही तोंड वाकडे करणार नाही असे प्रेम असायला हवे. आणि तसे प्रेम आमच्याकडून मिळते.

नवऱ्याने झिडकारले तरी प्रेम कमी-जास्त होणार नाही, असे प्रेम हवे. हिऱ्याच्या कुड्या आणून देतो त्यावेळेस प्रेम वाढते, ती सुद्धा आसक्तीच. म्हणजे हे जग आसक्तीने चालत आहे. प्रेम तर 'ज्ञानी पुरुषांपासून' ते थेट भगवंतापर्यंत असते, त्यांच्याजवळ प्रेमाचे लाईसन्स असते. ते त्या प्रेमानेच लोकांना सुखी करतात. प्रेमानेच बांधतात म्हणून सुटू शकत नाही. ज्ञानी पुरुषांपासून ते थेट तीर्थांकरांपर्यंत सर्वच प्रेमवाले, अलौकिक प्रेम! ज्यात लौकिकता नाममात्रही नसते.

## अति परिचयाने अवज्ञा

जिथे जास्त प्रेम वाटते, तिथेच अरुची होते, हा मानव स्वभावच आहे. आपण जेव्हा आजारी पडतो तेव्हा आपल्याला ज्याच्यावर प्रेम असेल त्याचाच कंटाळा येतो. ती व्यक्ती आपल्याला आवडत नाही. 'तुम्ही जा इथून, दूर बसा' असे म्हणावे लागते. आणि पतीकडून प्रेमाची अपेक्षा करायचीच नाही आणि पतीने जर आपल्याकडे प्रेमाची अपेक्षा ठेवली तर त्याला मूर्खच म्हणावे. आपल्याला तर आपल्या कामाशी काम. हॉटेलवाल्यासोबत संसार थाटायला जातो का आपण? चहा पिण्यास हॉटेलात गेलो तर पैसे देऊन परत येतो! तसेच इथे सुद्धा आपण कामापुरते काम करून घ्यावे.

## प्रेमाच्या आपुलकीत निभावतो सर्व चुका

घरच्यांसोबत 'नफा झाला' असे केव्हा म्हणता येईल? तर घरच्या सदस्यांना आपल्यासाठी प्रेम वाटेल तेव्हा. आपल्याशिवाय त्यांना करमणारच

नाही, केव्हा येतील, केव्हा येतील? असेच त्यांना वाटत असते. लोक लग्न करतात पण प्रेम नाही, ही तर फक्त विषयासक्ती आहे. प्रेम असेल तर एकमेकांशी वाटेल तितका विरोधाभास असला तरीही प्रेम कमी होत नाही. जिथे प्रेम नसेल तिथे आसक्ती म्हटली जाते. आसक्ती म्हणजे संडास! प्रेम तर पूर्वीच्या काळी असायचे. पती परदेशात गेला असेल आणि तो जर परत आला नाही, तर आयुष्यभर तिचे चित्त केवळ पतीतच असायचे, दुसरे कोणी आठवतच नसे. आणि आज तर दोन वर्ष पती आला नाही तर दुसरा पती करतील. मग याला प्रेम कसे म्हणायचे? हे तर संडास आहे. जसे संडास बदलतात तसे! जे गलन आहे, त्याला संडास म्हणतात. प्रेमात तर अर्पणता असते!

प्रेम म्हणजे *लगनी लागणे* (आपुलकी वाटणे) दिवसभर आठवतच राहते. लग्नाचे परिणाम दोन रुपात दिसतात, कधी भरभराटीत जाते तर कधी बरबादीत. प्रेम जास्त उफाळते आणि परत निवळते सुद्धा. जे उफाळते ती आसक्ती आहे. म्हणून जिथे उफाळते त्यापासून दूर राहावे. जिव्हाळा तर आतूनच असायला हवा. बाहेरील खोका (शरीर) बिघडला, सडला तरी सुद्धा प्रेम मात्र तसेच राहते. हे तर हात भाजला असेल आणि आपण म्हटले, की 'जरा धुवून द्या' तर नवरा म्हणेल 'नाही, माझ्याने बघवत नाही.' अरे, त्यादिवशी तर तू हात कुरवाळीत होता, आणि आज का असे? घृणा करुन कसे चालेल? जिथे प्रेम आहे तिथे घृणा नाही आणि जिथे घृणा आहे तिथे प्रेम नाही. संसारी प्रेम सुद्धा असेच असायला हवे की जे एकदम कमी होणार नाही आणि एकदम वाढणार नाही. नॉर्मालिटीमध्ये असायला हवे. ज्ञानींचे प्रेम तर कधीही कमी-जास्त होत नाही. ते प्रेम तर वेगळेच असते, त्यास परमात्म प्रेम म्हटले जाते.

प्रेम सर्वत्र असायला हवे. पूर्ण घरात प्रेम असायला हवे. प्रेम आहे तिथे कोणी चूक काढत नाही. प्रेमात चूक दिसत नाही. आणि हे प्रेम नाही, हा इगोईजम आहे. 'मी पती आहे' असे त्याला भान आहे, प्रेम त्यास म्हणावे की चूक वाटतच नाही. प्रेमात तर कितीही चुका असतील तरी निभावल्या जातात. आले का लक्षात?

**प्रश्नकर्ता :** हो, दादाजी

**दादाश्री :** म्हणजे चुकभूल झाली असेल तर प्रेमापोटी सोडून द्यावी. या मुलावर आपले प्रेम असेल ना, तर मुलांची चूक तुम्हाला दिसणार नाही. असू दे, काही हरकत नाही. असेच वाटते. प्रेमात सर्व निभावून घेतले जाते. निभावून घेतले जाते ना?

बाकी, ही तर सर्व आसक्ती आहे! घटक्यात बायको गळ्यात हात घालून लगट करते, आणि घटक्यात वाद घालते. 'तुम्ही असे केले नी तुम्ही तसे केले.' प्रेमात कधीही चूक नसते. प्रेमात चूक दिसतच नाही. हे तर प्रेम आहेच कुठे? प्रेम नको का?

जेव्हा चूक दिसणारच नाही तेव्हा आपण समजावे की याच्यावर आपले प्रेम आहे! खरोखर प्रेम असेल का या लोकांना?!

म्हणजे याला प्रेम म्हणायचेच कसे?

खरे तर, या काळात प्रेम पाहायला मिळतच नाही. ज्यास खरे म्हटले जाते ते प्रेम पाहायला मिळत नाही. अरे, एक माणूस मला म्हणतो की 'माझे तिच्यावर इतके प्रेम आहे, तरीही ती माझा तिरस्कार करते, मी म्हणालो ते प्रेम नव्हे. प्रेमाचा तिरस्कार कोणी करतच नाही.'

## पती शोधतो अक्कल, पत्नी शोधते हुशारी

तेव्हा प्रेमात जो स्वत:ची आहुती देतो, म्हणजे स्वत:ची सेफ साईड न ठेवता स्वत:ची आहुती देतो, ते खरे प्रेम. हल्ली तर ही गोष्ट कठीणच आहे.

**प्रश्नकर्ता :** अशा प्रेमास काय म्हटले जाते? अनन्य प्रेम म्हटले जाते?

**दादाश्री :** संसारात याला प्रेम म्हटले जाते. हे आसक्तीमध्ये धरले जात नाही, आणि त्याचे फळ सुद्धा फार उच्च प्रकारचे मिळते. परंतु, स्वत:ची आहुती देणे, असे तर कधी घडत नाही ना! हे तर स्वत:ची 'सेफसाईड' ठेऊनच काम करतात. 'सेफसाईड' करणार नाहीत अशा स्त्रिया किती आणि असे पुरुष किती?

सिनेमाला जातेवेळी आसक्तीच्या धुंदीतच जातात आणि परत येताना म्हणेल 'तुला अक्कलच नाही.' तेव्हा ती म्हणेल 'तुमच्यात तरी कुठे हुशारी आहे?' असे बडबडत घरी येतात. ती हुशारी शोधत असते.

**प्रश्नकर्ता :** हा, तर सर्वांचाच अनुभव आहे. कोणी बोलत नाही, पण प्रत्येकाला समजते की, 'दादा' म्हणतात, ती गोष्ट खरी आहे.

## प्रेमानेच जिंकावे

**प्रश्नकर्ता :** संसारात राहिल्यावर कित्येक जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागतात आणि जबाबदाऱ्या पार पाडणे तो एक धर्मच आहे. त्या धर्माचे पालन करताना जाणते-अजाणतेपणी कटू वचने बोलावी लागतात, तर ते पाप किंवा दोष मानले जाते का? या संसारी धर्माचे पालन करते वेळी कटू वचने बोलावी लागतात, तर ते पाप किंवा दोष आहे?

**दादाश्री :** असे आहे ना, कटू वचन बोलतेवेळी आपला चेहरा कसा होऊन जातो? गुलाबाच्या फुलासारखा होतो नाही का? म्हणजे आपला चेहरा बिघडला तर समजायचे की पाप लागले. कटूवचन बोलू नये. मुलाशी हळूवारपणे, शांतपणे बोला. मोजकेच बोला, परंतु शांतपणे, समजून बोला, प्रेम ठेवा, तर एक दिवस जिंकाल. कटूतेने जिंकू शकणार नाही. उलट तो विरोध करेल आणि त्याच्यावर वाईट परिणाम होईल. त्यामुळे तो मनात ठरवेल की 'आता तर मी वयाने लहान आहे, म्हणून मला इतके झिडकारता पण मी मोठा झाल्यावर तुम्हाला बघून घेईल.' तेव्हा असे करू नका. त्याला समजवावे. कधी ना कधी प्रेम जिंकेल. दोन दिवसातच त्याचे फळ येणार नाही, दहा दिवस, पंधरा दिवस, महिन्यापर्यंत तुमचे प्रेम असू द्या. पाहा मग, त्या प्रेमाचे काय फळ येते ते तर पाहा! तुम्हाला आवडली ही गोष्ट? कटू वचन बोलल्यावर आपला चेहरा बिघडत नाही का?

**प्रश्नकर्ता :** आपण त्याला अनेकदा समजावतो, तरी सुद्धा तो समजत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** समजावण्याची गरजच नाही. तुमचे प्रेम असू द्या. पण

तरी आपण त्यास हळूवार समजवावे. आपल्या शेजाऱ्यांनाही असे कटू वचन बोलतो का आपण?

**प्रश्नकर्ता :** पण इतका धीर असला पाहिजे ना?

**दादाश्री :** आता डोंगरावरून जर एखादा दगड घरंगळत आला आणि तो तुमच्या डोक्याला लागला तेव्हा तुम्ही वर पाहता आणि मग कोणावर रागावता? त्यावेळी शांत राहता ना? तिथे कोणी दिसत नाही म्हणून आपण समजतो की हा दगड कोणी टाकलेला नाही, म्हणजे आपोआपच पडला आहे. तेव्हा कोणाचाही दोष मानत नाही. तसेच इथेही आपोआपच पडत असते. फक्त इथे टाकणारा दिसतो, बाकी आपोआपच पडत असते. हा तुमचाच हिशोब चुकता होत आहे. या जगात सर्व हिशोबच चुकते होत आहेत. नवीन हिशोब बांधले जात आहेत आणि जुने हिशोब चुकते होत आहेत. समजले ना? म्हणून मुलांबरोबर सरळ बोला, चांगली भाषा बोला.

## प्रेमाने वाढवावे रोपट्याला

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात कोणी चुकीचे करत असेल तेव्हा त्याला टोकावे लागते, त्यामुळे त्याला दुःखं होते, तर मग तिथे काय करावे?

**दादाश्री :** टोकण्यास हरकत नाही, पण आपल्याला टोकता आले पाहिजे ना! सांगता आले पाहिजे ना!

**प्रश्नकर्ता :** ते कसे सांगावे?

**दादाश्री :** तुम्ही मुलाला म्हणाल 'तुला अक्कलच नाही, गाढव आहेस,' असे म्हटल्यावर काय होईल! त्याला सुद्धा अहंकार आहे की नाही? तुम्हालाच जर तुमचा बॉस म्हणेल की 'तुम्हाला अक्कल नाही, गाढव आहात,' असे म्हणेल तर काय होईल? असे बोलू नये, टोकता आले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** मग कशाप्रकारे टोकावे?

**दादाश्री :** त्याला जवळ बसवावे, मग म्हणावे आपण हिंदुस्तानातील

लोक, आपली आर्य प्रजा, आपण काही अडाणी नाही, तेव्हा आपल्याकडून असे व्हायला नको. असे सर्व प्रेमाने समजवायचे तेव्हा मार्गावर येईल. आणि तुम्ही तर लेफ्ट ॲन्ड राईट, लेफ्ट ॲन्ड राईट, घेत राहता, असे कसे चालेल?

प्रेमाशिवाय परिणाम येणार नाही. एखादे रोपटे जरी वाढवायचे असेल ना, तरीही तुम्ही ते प्रेमाने वाढवले तर खूप छान वाढते. तुम्ही जर असेच पाणी टाकून आरडाओरडा कराल तर काहीही निष्पन्न होणार नाही. एक रोपटे वाढवायचे असेल तरीही! तुम्ही म्हणाल की ओहोहो, हे रोपटे तर फार छान वाढले, तर ते त्याला चांगले वाटते! मग तो सुद्धा चांगली मोठमोठी फुले देतो! मग या मनुष्यावर केवढा परिणाम होत असेल?

## सांगण्याची पद्धत

**प्रश्नकर्ता :** पण मी काय करायला हवे?

**दादाश्री :** आपल्या बोलण्याचा काही फायदा होत नसेल तर आपण गप्प बसावे. आपण मूर्ख आहोत, आपल्याला बोलता येत नाही, म्हणून बोलणे बंद करावे. आपले बोललेले फळत नाही आणि उलट आपले मन बिघडते, आपला जन्मही बिघडतो. असे कोण करेल?

म्हणजे एकाही माणसाला सुधारता येईल असा हा काळ नाही. जो स्वत:च बिघडलेला आहे तो समोरच्याला कसा सुधारेल? तो स्वत:च निर्बळ असेल तर समोरच्याला कसा सुधारेल? त्यासाठी तर बळ असले पाहिजे. म्हणजे यात प्रेमाचीच आवश्यकता आहे.

## प्रेमाची पॉवर

समोरच्याचा अहंकार वर येणारच नाही. आमचा आवाज सत्तावाही नसतो. सत्ता वापरु नये. मुलाला काही सांगताना तुमचा आवाज सत्तावाही नसावा.

**प्रश्नकर्ता :** हो, आपण म्हणाला होतात, की कोणी आपल्याकरिता दरवाजे बंद करेल त्याआधीच आपण थांबायला हवे.

**दादाश्री :** हो खरी गोष्ट आहे. तो आपल्यासाठी दरवाजे बंद करेल त्या अगोदर आपण थांबायला हवे. त्याला दरवाजे बंद करण्याची वेळ येईपर्यंत थांबलो नाही तर आपला मूर्खपणा ठरेल. काय? असे होता कामा नये. आणि माझा सत्तावाही आवाज कधीही निघाला नाही. सत्तावाही आवाज असता कामा नये. लहान असेपर्यंत सत्तावाही आवाज दाखवावा लागतो, 'चूप बस' असे. पण तेव्हा सुद्धा मी प्रेमच दाखवितो. मी प्रेमाने वश करू इच्छितो.

**प्रश्नकर्ता :** प्रेमात जितकी पॉवर (शक्ती) आहे, तितकी पॉवर सत्तेत नाही ना?

**दादाश्री :** नाही, पण जोपर्यंत आधीचा कचरा (दोष) निघत नाही तोपर्यंत तुम्हाला प्रेम उत्पन्न होत नाही ना! तू आता सर्व कचरा काढतेस की नाही काढत? ते किती चांगले, हार्टवाले आहेत! जे हार्टीली असतात ना, त्यांच्याशी भांडायचे नाही. त्यांच्याशी तू चांगली वाग. वाद घालायचा असेल तर बुद्धीवाल्याशी वाद घाल.

रोपटे लावले असेल तर त्याला सतत रागवू नये की तू वाकडे होऊ नकोस, फुले मोठी आण. आपण त्याला खत पाणी देत राहावे. गुलाबाचे रोप जर इतके सारे काम करते, तर ही मुले तर मनुष्य आहेत! आणि आई-वडील तर त्यांना रागावतात सुद्धा, धोपटतात सुद्धा.

नेहमी प्रेमानेच जग सुधारते, त्याशिवाय दुसरा कोणताही उपाय नाही. जर धाकाने सुधारत असेल ना तर ही सरकार लोकतंत्राला उडवून टाकेल आणि जो कोणी गुन्हा करेल त्याला जेलमध्ये टाकेल व फाशी देईल. जग प्रेमानेच सुधारते.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा, आम्ही प्रेम करत असतो तरीही समोरची व्यक्ती समजू शकत नाही.

**दादाश्री :** मग तेव्हा आपण काय करावे? शिंगे उगारावी?

**प्रश्नकर्ता :** काय करावे तेच कळत नाही.

**दादाश्री :** नाही, मग शिंगे मारतात. मग आपणही शिंगे मारतो, म्हणून तो सुद्धा शिंगे मारतो, अशी लढाई सुरु होते. त्यामुळे जीवन क्लेशमय होते.

**प्रश्नकर्ता :** तर मग अशा परिस्थितीत आम्ही समता कशी ठेवावी? असे जेव्हा घडते तेव्हा कसे वागावे? काय करावे हे समजतच नाही.

**दादाश्री :** कुठल्या परिस्थितीत?

**प्रश्नकर्ता :** आपण प्रेम ठेवावे आणि समोरची व्यक्ती समजतच नसेल, आपले प्रेम त्याला समजत नसेल. तेव्हा मग आपण काय करावे?

**दादाश्री :** काय करावे? आपण शांतच राहावे, शांत राहावे, दुसरे काय करणार? आपण काय त्याला मारायचे?

**प्रश्नकर्ता :** परंतु आम्ही अजून त्या स्थितीपर्यंत पोहोचलो नाही की शांत राहू शकू.

**दादाश्री :** मग तेव्हा आपणही भांडायचे! दुसरे काय करणार? पोलिस फटकारतो, तेव्हा कसे शांत राहता?

**प्रश्नकर्ता :** पोलिसवाल्याची ऑथोरीटी आहे, त्याची सत्ता आहे.

**दादाश्री :** मग आपण त्यालाही ऑथोराइज (अधिकृत) करावे. पोलिसवाल्यांसोबत तर सरळ राहता आणि येथे मात्र सरळ राहू शकत नाही!

## मुले आहेत प्रेमाचे भुकेले!

आजच्या मुलांना बाहेर जायला आवडणारच नाही असे काही करा, की घरात मुलांना आपले प्रेम, प्रेम आणि प्रेमच दिसेल. मग आपले संस्कार चालतील.

## प्रेमाचा करा असा वर्षाव

तुम्ही त्याला एक टपली जरी मारली तरी तो रडायला लागेल, याचे

काय कारण ? त्याला लागले म्हणून ? नाही, त्याला लागल्याचे दु:ख नाही, त्याचा अपमान केला याचे दु:ख आहे.

## प्रेमामुळेच वश होतात

या दुनियेला सुधारण्याचा मार्गच प्रेम आहे. जग ज्याला प्रेम मानते ते प्रेम नाही. ती तर आसक्ती आहे. तुम्ही ह्या बेबीवर प्रेम करता, परंतु तिने जर काचेचा पेला फोडला तर तुमचे प्रेम राहते ? तेव्हा तर तुम्ही चिडता. म्हणजे ती आसक्ती आहे.

## प्रेमानेच सुधारते जग

आणि प्रेमानेच सुधारते. हे सर्व सुधारायचे असेल, तर ते प्रेमानेच सुधारेल, या सर्वांना मी सुधारतो, ते प्रेमाने सुधारतो. हे देखील आम्ही प्रेमानेच सांगत आहोत ना ! प्रेमाने सांगितले म्हणजे गोष्ट बिनसणार नाही आणि जर द्वेषाने सांगू तर सर्व बिनसेल. दुधात दही पडले नसेल पण अशीच जरा हवा लागली, तरी त्या दुधाचे दही बनून जाते.

म्हणजे प्रेमाने सर्वकाही बोलू शकतो. जो प्रेमवाला मनुष्य आहे ना, तो सर्वकाही बोलू शकतो. आम्ही काय सांगू इच्छितो ? की प्रेमस्वरुप व्हा, तर हे जग तुमचेच आहे. जिथे वैर असेल तिथे वैरातून हळूहळू प्रेम स्वरूप व्हा. वैरामुळे हे जग इतके 'रफ' (रुक्ष) दिसते. पाहा ना, येथे प्रेम स्वरूप, येथे कोणासही थोडे सुद्धा वाईट वाटत नाही आणि सर्व किती आनंदाने राहतात.

## कदर मागतात तिथे प्रेम कसले ?

बाकी, या काळात प्रेम पाहायला मिळणार नाही. ज्यास खरे प्रेम म्हणतात ना ते पाहायला मिळणारच नाही. अरे, एक माणूस मला सांगत होता की, 'माझे तिच्यावर इतके सारे प्रेम आहे' 'तरीही ती मला झिडकारते.' मी म्हणालो ' ते प्रेम नाही. प्रेमाचा तिरस्कार कोणी करतच नाही.'

**प्रश्नकर्ता :** आपण ज्या प्रेमाची गोष्ट करीत आहात त्या प्रेमात अपेक्षा असतात का ?

**दादाश्री :** अपेक्षा? प्रेमात अपेक्षाच नसते. दारू पीत असेल त्याच्यावरही प्रेम आणि दारू पित नसेल त्याच्यावरही प्रेम असते. प्रेमात अपेक्षा नसते. प्रेम सापेक्ष नसते.

**प्रश्नकर्ता :** परंतु प्रत्येक मनुष्याला माझ्याकरिता दोन शब्द चांगले बोलावे, माझी कदर करावी अशी अपेक्षा नेहमीच असते. शिव्या सहन करणे कोणासही आवडत नाही.

**दादाश्री :** स्वत:ची कदर होईल अशी अपेक्षा ठेवतो तेव्हा ते प्रेमच नाही. ती सर्व आसक्ती आहे. हा सर्व मोहच आहे.

जे लोक प्रेमाची अपेक्षा करतात ते सर्व मूर्ख आहेत, 'फुलीश' आहेत. तुमचे पुण्य असेल तर कोणी तुमच्याशी प्रेमाने बोलेल. म्हणजे त्या पुण्यामुळे प्रेम आहे, आणि जर तुमच्या पापाचा उदय झाला की तुमचा भाऊच म्हणेल, 'तू नालायक आहेस, तू असा आहेस, तू तसा आहेस.' वाटेल तितके उपकार कराल तरीही. म्हणजे हे पुण्य आणि पापाचे प्रदर्शन आहे, आणि तुम्हाला वाटते की तोच असे करत आहे.

म्हणजे हे तर पुण्य बोलत आहे. तेव्हा यात प्रेम तर नसतेच ज्ञानी पुरुषाजवळ जाल, तेव्हा प्रेमासारखी वस्तू दिसते. अन्यथा प्रेम तर जगात कुठेही नाही.

## आतील शिल्लक सांभाळा

हे तर लोक बाहेर काही वाद झाले की मैत्री तोडतात. प्रथम मैत्री असते, आणि फार प्रेमाने राहत असतात, म्हणजे बाहेर सुद्धा प्रेम आणि आत सुद्धा प्रेम! नंतर जेव्हा वाद होतो तेव्हा बाहेर सुद्धा वाद आणि आत सुद्धा वाद. आत वाद करू नये. त्याला समजणार नाही पण तरी आत प्रेम राहू द्यावे. आत प्रेम शिल्लक असेल ना, तोपर्यंत मनुष्यपण जाणार नाही. आतील शिल्लक गेली म्हणजे मनुष्यपण सुद्धा निघून जाईल.

## प्रेमात संकुचितपणा नसतो

माझ्यात प्रेम असेल की नाही? की तुम्ही एकटेच प्रेमवाले आहात?

हे तुम्ही तुमच्या प्रेमाला संकुचित केले आहे की, 'ही बायको आणि ही मुले,' जेव्हा की माझे प्रेम विस्तारपूर्वक आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रेम इतके संकुचित असू शकते की एकच व्यक्ती पुरते मर्यादित राहते?

**दादाश्री :** प्रेम संकुचित असूच शकत नाही. त्यासच प्रेम म्हणतात. जर संकुचित असेल ना की तितक्या चौकटी पुरतेच, तर ती आसक्ती म्हटली जाते. संकुचित म्हणजे कसे? तर चार भाऊ असतील, आणि त्या चौघांना तीन-तीन मुले असतील, ते सर्व एकत्र रहात असतील तोपर्यंत घरात 'आमचे आमचे' असे बोलतात. आमचा ग्लास फुटला असे बोलतात. पण मग चौघेही जेव्हा वेगळे होतात तेव्हा लगेच दुसऱ्याच दिवसापासून, म्हणजे बुधवारी वेगळे झाले तर गुरुवारी ते काही वेगळेच बोलतात. 'हे आमचे आणि हे तुमचे' अशी संकुचितता येत जाते. म्हणजे पूर्ण घरात जे प्रेम पसरलेले होते ते आता वेगळे झाल्यामुळे संकुचित झाले. मग जेव्हा पूर्ण गल्लीनुसार, युवक मंडळानुसार काही कार्य करायचे असेल तेव्हा परत त्यांचे प्रेम एक होते. प्रेम असेल तिथे संकुचितता नसते, विशालता असते.

## राग आणि प्रेम

**प्रश्नकर्ता :** तर प्रेम आणि राग (आसक्ती, मोह) हे दोन्ही शब्द समजवा.

**दादाश्री :** राग ही पौद्गलिक (पुरण-गलन होणारी) वस्तू आहे आणि प्रेम ही खरी वस्तू आहे. आता प्रेम कसे असायला हवे? की जे वाढत नाही आणि घटतही नाही, त्यास प्रेम म्हटले जाते. आणि वाढते-घटते त्यास राग म्हटले जाते. राग आणि प्रेमात फरक असा आहे की जो एकदम वाढतो त्यास राग म्हणतात, मग फसलाच समजा. जर प्रेम वाढले तर रागात परिणमित होते. प्रेम कमी झाले तर द्वेषात परिणमित होते, म्हणून त्यास प्रेम म्हटलेच जात नाही ना! हे तर आकर्षण आणि विकर्षण आहे. आपले लोक ज्याला प्रेम म्हणतात त्यास भगवंत आकर्षण म्हणतात.

## राग 'कॉजेस', अनुराग 'इफेक्ट'

**प्रश्नकर्ता :** परंतु दादा, राग होतो, त्यातून अनुराग होतो आणि नंतर त्यातून आसक्ती होत असते.

**दादाश्री :** असे आहे की, राग हे 'कॉजेस' (कारणे) आहेत, आणि अनुराग व आसक्ती हा इफेक्ट (परिणाम) आहे.

इफेक्ट बंद करायचा नाही, कॉजेस बंद करायचे. कारण ही आसक्ती कशी आहे? एक ताई मला म्हणते, 'आपण मला ज्ञान दिले आणि माझ्या मुलालाही ज्ञान दिले आहे. तरी सुद्धा मला त्याच्यावर इतका राग (मोह) आहे की ज्ञान दिले तरी सुद्धा राग जात नाही, तेव्हा मी म्हणालो' 'ताई तो राग नाही, ती आसक्ती आहे.' तेव्हा ती म्हणाली, 'परंतु तशी आसक्ती राहायला नको ना?' ही आसक्ती 'तुम्हाला,' 'शुद्धात्माला' नाही.

## दृष्टी फरकामुळे आसक्ती

**प्रश्नकर्ता :** मनुष्याला जगाविषयी आसक्ती का असते?

**दादाश्री :** संपूर्ण जग आसक्तीमयच आहे, जोपर्यंत 'सेल्फ' (आत्म्या) मध्ये राहण्याची शक्ती उत्पन्न होत नाही, 'सेल्फची' रमणता उत्पन्न होत नाही. तोपर्यंत सगळे आसक्तीतच पडलेले आहेत. साधू-संन्यासी-आचार्य, सगळे आसक्तीतच पडलेले आहेत. संसाराची, बायकोची, मुलांची आसक्ती सुटली तर पुस्तकाची आसक्ती चिकटते. किंवा मग 'हम' 'हम' ची आसक्ती! म्हणजे जिथे जातो तिथे सर्व आसक्त्याच आहेत.

## आसक्ती म्हणजेच विकृत प्रेम

जे प्रेम कमी जास्त होते त्यास आसक्ती म्हटली जाते, आमचे प्रेम कमी-जास्त होत नाही. तुमचे प्रेम कमी-जास्त होत असते म्हणून त्यास आसक्ती म्हटली जाते. कदाचित ऋणानुबंध असलेल्या व्यक्तीसाठी प्रेम कमी-जास्त झाले तर 'आपण' त्यास 'जाणावे' आता प्रेम कमी-जास्त व्हायला नको. नाही तर प्रेम एकदम वाढले तरीही आसक्ती म्हटली जाते

आणि कमी झाले तरीही आसक्ती म्हटली जाते, आणि आसक्तीमध्ये राग-द्वेष होतच असतात. आसक्तीलाच प्रेम मानतात, ही लोकभाषा आहे ना! दुसरे सर्व सुद्धा असेच म्हणतात, त्यालाच प्रेम म्हणतात. अशीच लोकभाषा झाली आहे!

**प्रश्नकर्ता :** प्रेम आणि आसक्तीमधील फरक समजवाना!

**दादाश्री :** जे विकृत प्रेम आहे, त्यालाच म्हणतात आसक्ती, हे जग विकृत आहे. यात आपण ज्याला प्रेम म्हणतो, ते विकृत प्रेम म्हटले जाते आणि त्यालाच आसक्ती म्हटली जाते.

म्हणजे संपूर्ण जग आसक्तीतच गुंतलेले आहे. अरे, आपल्या आत बसले आहेत ना, ते अनासक्त आहेत, शिवाय ते अकामीही आहेत आणि हे सर्व कामनावाले. आसक्ती आहे तिथे कामना आहे. लोक म्हणतात की 'मी निष्काम झालो आहे.' पण जे आसक्तीत राहतात त्यांना निष्काम म्हटले जात नाही. आसक्तीसोबत कामना असतेच. बरेच लोक म्हणतात की 'मी निष्काम भक्ती करतो.' मी म्हणालो 'कर ना, तू आणि तुझी बायको दोघेही (!) करा. परंतु आसक्ती गेली नाही, तोपर्यंत तू निष्काम भक्ती करशील तरी कशी?'

आसक्ती तर इथपर्यंत चिकटते की चांगल्या कप-बशा असतील ना, तर त्यातही आसक्ती चिकटते, अरे, कप-बशा काय जिवंत आहेत?! एका लाकडाच्या व्यापाऱ्याकडे मी गेलो होतो तो व्यापारी दिवसातून पाच वेळा जाऊन लाकूड पाहून यायचा तेव्हाच त्याला समाधान होत असे! लाकूड इतके सुंदर रेशमासारखे मऊ, आणि गोल!! आणि तो हाताने असा कुरवाळीत असे, तेव्हाच त्याला संतुष्टी व्हायची. तेव्हा या लाकडावर किती आसक्ती आहे! फक्त स्त्रीवरच आसक्ती असेल असे काही नाही. विकृत प्रेम जिथे चिकटले तिथे आसक्ती!

## आसक्तीपासून मुक्तीचा मार्ग

**प्रश्नकर्ता :** आसक्तीचे सूक्ष्म स्वरूप आपण समजाविले. तर आता या आसक्तीपासून मुक्ती कशी मिळवायची?

**दादाश्री :** 'मी अनासक्त आहे,' असे जर 'त्याला' भान झाले तर मुक्ती मिळेल. आसक्ती काढायची नाही, 'अनासक्त आहे' याचे भान व्हायला हवे. बाकी, आसक्ती काही निघत नाही. आता तुम्ही जिलेबी खाल्यानंतर चहा प्याल तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** चहा अगोड लागेल.

**दादाश्री :** हो, तसेच स्वत:चे स्वरूप प्राप्त झाल्यावर हा संसार ही अगोड वाटतो. तेव्हा मग आसक्ती निघून जाते. 'स्वत:चे स्वरूप' प्राप्त झाल्यावर जर त्यास जपून ठेवेल आणि आम्ही सांगू त्या प्रमाणे आज्ञापूर्वक राहील तर त्याला हा संसार अगोड लागेल.

आसक्ती काढल्याने जात नाही. जसे हे लोहचुंबक आणि टाचणी दोघांना जी आसक्ती आहे ती जात नाही. त्याचप्रमाणे या माणसांचीही आसक्ती जात नाही, कमी होते, प्रमाण कमी होते परंतु जात नाही, आसक्ती केव्हा जाईल? 'स्वत:' अनासक्त होईल तेव्हा. 'स्वत:' आसक्तच झाला आहे. नामधारी अर्थात आसक्त! नावावर आसक्ती, सर्वांवर आसक्ती! पती झालात म्हणून आसक्त, बाप झालात म्हणून आसक्त!!

**प्रश्नकर्ता :** तर या संयोगांचा परिणाम होत नाही तीच खरी अनासक्ती आहे का?

**दादाश्री :** नाही, अहंकाराचा लोप झाल्यानंतर अनासक्त होतो. म्हणजे अहंकार आणि ममता दोन्हीही जातील तेव्हा अनासक्ती! पण असा कोणीच नसतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे हे सर्व करायचे, पण त्यात आसक्ती नसावी, कर्म लेपायमान व्हायला नकोत...

**दादाश्री :** पण लोकांमध्ये आसक्ती स्वाभाविक रित्या राहतेच. कारण त्याची स्वत:ची मूळ चूक गेलेली नाही. 'रूट कॉज' (मूळ कारण) नष्ट झाले पाहिजे. रूटकॉज काय आहे? तर त्याला 'मी चंदुभाऊ आहे' ही बिलिफ (मान्यता) बसली आहे. म्हणून चंदुभाऊसाठी कोणी म्हणेल की 'चंदुभाऊ' चे असे केले जात आहे, त्याने असे नुकसान केले आहे.'

असे जर चंदुभाऊ वर आरोप करण्यात आले तर 'तो' रागावतो 'त्याच्यात' स्वत:ची निर्बळता उत्पन्न होते.

तर हे रूटकॉज आहे आणि, हीच मोठी चूक आहे. दुसऱ्या सर्व चुका नाहीतच. मुळात हीच चूक आहे की 'तुम्ही' जे आहात ते ओळखत नाही आणि जे नाहीत त्याचा आरोप करता. लोकांनी नाव दिले ते तर ओळखण्याचे साधन आहे, की 'भाऊ, हे चंदुभाऊ आहेत आणि हे इन्कमटॅक्स ऑफिसर आहेत.' हे सर्व ओळखण्याचे साधन आहे. या स्त्रीचे पती, तेही ओळखण्याचे साधन आहे. परंतु 'स्वत: खरोखर कोण आहे?' ते जाणत नाही, त्याचीच ही सर्व अडचण आहे ना?

**प्रश्नकर्ता :** शेवटी अडचण तर तिथेच आहे ना?

**दादाश्री :** म्हणजे हे 'रूटकॉज' आहे. हे रूटकॉज तोडण्यात आले तरच काम होईल.

चांगले-वाईट हे सर्व बुद्धीवर अवलंबून असते. बुद्धीचा धंदा काय? तर जिथे जाईल तिथे प्रॉफिट आणि लॉस, फायदा आणि नुकसान बघणार. बुद्धी प्रॉफीट आणि लॉसशिवाय जास्त काम करू शकत नाही. तर आता बुद्धीपासून दूर व्हा. अनासक्त योग ठेवा. आत्म्याचा स्वभाव कसा आहे? अनासक्त स्वरूप आहे. म्हणजे स्वत:चा स्वभाव हा असा आहे. तू सुद्धा स्वभावाने अनासक्त होऊन जा. जसा स्वभाव आत्म्याचा आहे, तसाच स्वभाव आपण केला, तर एकाकार होईल, मग काही वेगळे नाहीच. फक्त स्वभावच बदलायचा आहे.

आता आपल्यात आसक्ती असेल आणि आपण भगवंतासारखे होऊ, हे कसे शक्य आहे? भगवंत अनासक्त, मग अनासक्त आणि आसक्तीचा मेळ कसा काय बसेल? आपल्यात क्रोध असेल तर भगवंताशी मिलन कसे होईल?

भगवंतात जो धातू आहे, ते धातुरूप तू होऊन जा. जे सनातन आहे, तेच मोक्ष आहे. सनातन म्हणजे निरंतर. निरंतर राहते तोच मोक्ष आहे.

## करायला गेलो काय आणि झाले काय?

**प्रश्नकर्ता :** दादा, तुम्ही कशाप्रकारे अनासक्त झालात?

**दादाश्री :** सर्व आपोआप 'बट नॅचरल' प्रकट झाले. मला काही माहीत नाही की हे कसे काय घडले!

**प्रश्नकर्ता :** परंतु आत्ता तरी आपणास माहीत पडते ना? त्या पायऱ्या आम्हाला सांगा ना.

**दादाश्री :** मी काही करायला गेलो नव्हतो, काही झालेही नव्हते. मी करायला गेलो काय आणि झाले काय! मी तर दुधात तांदूळ टाकून एवढीसी खीर बनवायला गेलो होतो, परंतु हे तर अमृत तयार झाले!! ते सर्व पूर्वीचे सामान जमा झालेले. मला असे वाटायचे की आत आपल्याजवळ काहीतरी आहे, इतके नक्कीच वाटायचे. त्याचा थोडा घमेंडही वाटायचा.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मला वाटले की आपण ज्याप्रकारे अनासक्त झालात त्याचे वर्णन कराल तर ती रीत मलाही समजेल.

**दादाश्री :** असे आहे की, हे 'ज्ञान' घेतले आणि मग जो आमच्या आज्ञेत राहतो त्याला अनासक्त म्हटले जाते. मग जरी तो खात-पित असेल किंवा काळा कोट घालत असेल किंवा पांढरा कोट-पॅंट घालत असेल, वाटेल ते घालत असेल परंतु जो आमच्या आज्ञेत राहिला तो अनासक्त म्हटला जातो. आमच्या आज्ञा अनासक्तीचेच 'प्रोटेक्शन' आहे.

## आसक्ती, परमाणूंचे विज्ञान

हे कशासारखे आहे? येथे हा लोहचुंबक असेल आणि येथे टाचणी असेल तर आपण लोहचुंबकाला जरा असे असे फिरवले तर टाचणी वर-खाली होते की नाही? तर होते. लोहचुंबक जवळ नेले तर टाचणी त्याला चिकटते. त्या टाचणीमध्ये आसक्ती कोठून आली? तसेच या शरीरात लोहचुंबक नावाचा गुण आहे. कारण आत इलेक्ट्रिक बॉडी आहे. म्हणजे त्या बॉडीच्या आधाराने ही इलेक्ट्रिसिटी उत्पन्न झाली आहे. त्यामुळे

शरीरात लोहचुंबक नावाचा गुण उत्पन्न होतो, तेव्हा जिथे स्वत:चे परमाणू जुळतात तिथेच आकर्षण निर्माण होते. इतरांबरोबर काहीच होत नाही. त्या आकर्षणालाच आपले लोक राग-द्वेष म्हणतात. म्हणतील 'माझा देह ओढला जात आहे.' अरे, तुझी इच्छा नाही तरीही देह का ओढला जातो? मग तिथे 'तू कोण आहेस?'

आपण देहाला म्हटले की, 'तू जाऊ नकोस' तरी उठून चालायला लागतो. कारण हा देह परमाणुंपासून बनलेला आहे ना, परमाणुंचीच ओढ आहे ही. जुळणारे परमाणू असतील तिथे हा देह ओढला जातो. नाही तर आपली इच्छा नसेल तरीही हा देह कसा ओढला जाईल? देह ओढला जातो त्यास जगातील लोक म्हणतात 'मला याच्यावर फार राग (मोह) आहे. आपण जर त्याला विचारले की, भाऊ, ओढवून घ्यायची तुझी इच्छा आहे?' तर तो म्हणतो 'नाही, माझी इच्छा तर नाही, तरी सुद्धा, मी ओढला जातो.' तर मग हा राग नाही. हा तर आकर्षणचाच गुण आहे. पण तरी ज्ञान नसेल तर त्यास आकर्षण म्हटले जात नाही. कारण त्याला तर असेच वाटते की, 'हे मीच केले' आणि हे 'ज्ञान' असेल तर 'स्वत:' फक्त जाणतो की आकर्षणामुळे हा देह ओढला गेला यात मी काहीच केले नाही. म्हणजे हा देह क्रियाशील बनतो आणि ओढला जातो. हे सर्व परमाणुंचेच आकर्षण आहे.

हे मन-वचन-काया आसक्त स्वभावाचे आहेत. आत्मा आसक्त स्वभावाचा नाही.आणि हा जो देह आसक्त होतो ते लोहचुंबक आणि टाचणीसारखे आहे. कारण कोणतेही लोहचुंबक असो पण ते तांब्याला ओढत नाही. ते कशास ओढेल? हो, फक्त लोखंडालाच ओढेल. पितळ असेल तर ओढत नाही. अर्थात स्वजातीयलाच ओढतो. तसेच आपल्या शरीरात जे परमाणू आहेत ते लोहचुंबकवाले आहेत, ते स्वजातीयलाच ओढतात. समान स्वभावाचे परमाणूच ओढले जातात. वेडया बायकोशी पटते आणि शहाणी बहिण जरी त्याच्याशी चांगले बोलत असेल तरी तिच्याशी पटत नाही. कारण तिथे परमाणू जुळत नाहीत.

म्हणजे या मुलांवर सुद्धा आसक्तीच आहे. परमाणू-परमाणू जुळून

आले. तीन परमाणू आपले आणि तीन परमाणू त्यांचे, असे परमाणू जुळून आलेत म्हणून आसक्ती होते. माझे तीन परमाणू आणि तुमचे चार परमाणू असतील तर काहीच परिणाम होत नाही. म्हणजे हे सर्व विज्ञानच आहे.

आसक्ती हा देहाचा गुण आहे, परमाणूंचा गुण आहे. तो गुण कसा आहे ? लोहचुंबक आणि टाचणीचा जसा संबंध आहे तसाच हा संबंध आहे. देहास जुळतील, अशा परमाणुंमध्येच देह ओढला जातो, तेव्हा ती आसक्ती आहे.

आसक्ती तर अबॉव नॉर्मल आणि बिलो नॉर्मल सुद्धा असू शकते. जेव्हा की प्रेम नॉर्मालिटीत असते. एकसमानच असते. त्यात कोणत्याही प्रकारचा बदल होतच नाही. ही आसक्ती तर जडची आहे, चैतन्यात नाममात्र आसक्ती नसते.

व्यवहारात अभेदता राहते त्यामागे पण कारण आहे. ते परमाणू आणि आसक्तीचे गुण आहेत. परंतु त्यात कुठल्याक्षणी काय घडेल ते सांगता येत नाही. जोपर्यंत परमाणू जुळतात तोपर्यंत आकर्षण होते आणि त्यामुळे अभेदता वाटते. आणि जर परमाणू जुळले नाहीत तर विकर्षण होते व वैर निर्माण होते. अर्थात आसक्ती असेल तिथे वैर असतेच. आसक्तीमध्ये हित-अहिताचे भान राहत नाही. प्रेमात संपूर्ण हित-अहिताचे भान राहते.

म्हणजे हे परमाणूंचे सायन्स आहे. यात आत्म्याला काही सुद्धा देणेघेणे नाही. परंतु लोक भ्रांतीमुळे परमाणुंच्या आकर्षणालाच असे मानतात की 'मी ओढला गेलो' आत्मा कधीच ओढला जात नाही.

## भ्रांतीची मान्यता कुठे आणि वास्तविकता कुठे!

हे तर सुई आणि लोहचुंबकच्या आकर्षणामुळे तुम्हाला असे वाटते की मला प्रेम आहे म्हणून मी ओढला जातो. परंतु त्यात प्रेमासारखे काही नाहीच.

**प्रश्नकर्ता :** तर लोकांना हे कळत नाही की आपले प्रेम आहे की नाही ?

**दादाश्री :** प्रेम तर सर्वांनाच कळते. दीड वर्षाच्या मुलासही कळते. त्यासच प्रेम म्हटले जाते. दुसरी सर्व तर आसक्तीच आहे. कुठल्याही परिस्थितीत प्रेम वाढत नाही किंवा कमी होत नाही त्यास प्रेम म्हणतात. तेव्हा यास प्रेम म्हणायचेच कसे? ही तर भ्रांतीच आहे. भ्रांतभाषेचा शब्द आहे.

## आसक्तीमधून उद्‌भवते वैर

जगाने सर्व काही पाहिले परंतु प्रेम पाहिले नव्हते, आणि जग ज्यास प्रेम म्हणते ती तर आसक्ती आहे. आसक्तीतूनच ही सर्व ढवळाढवळ होत असते.

लोक समजतात की हे जग प्रेमामुळेच टिकून राहिले आहे. परंतु प्रेमामुळे हे जग टिकून राहिले नाही. वैरामुळे टिकून राहिले आहे, प्रेमाचे फाऊंडेशनच नाही. वैराच्या फाऊंडेशनवरच उभे राहिले आहे. वैराचेच फाऊंडेशन आहे. तेव्हा हे वैर सोडा. म्हणून तर आम्ही वैराचा निकाल लावा असे म्हणत असतो ना? समभावे निकाल लावण्याचे हेच तर कारण आहे.

भगवंत म्हणतात की द्वेष परिषह उपकारी आहे. प्रेम परिषह कधीच सुटणार नाही. संपूर्ण जग प्रेम परिषहातच फसलेले आहे म्हणून प्रत्येकास दुरून नमस्कार करून सुटून जावे. कोणावरही प्रेम ठेऊ नका. आणि कोणाच्या प्रेमात फसूही नका. प्रेमाचा तिरस्कार करून सुद्धा मोक्षाला जाता येत नाही. तेव्हा सावध राहा! मोक्षाला जायचे असेल तर विरोधकांचे उपकार मानावे. जे प्रेम करतात तेच आपल्याला बंधनात टाकतात, जेव्हा की विरोध करणारे तर उपकारी-मदतगार ठरतात. ज्यांनी आपल्यावर प्रेमाचा वर्षाव केला आहे त्यांचा तिरस्कार होणार नाही, अशाप्रकारे सुटून जावे. कारण प्रेमाच्या तिरस्काराने संसार उभा राहिला आहे.

## 'स्वत:' आहे स्वभावानेच अनासक्त

तुम्ही स्वत:च अनासक्त आहात. मी काही तुम्हाला अनासक्ती दिलेली नाही. अनासक्त हा तर तुमचा स्वभावच आहे. आणि तुम्ही दादांचे

उपकार मानता की दादांनी अनासक्ती दिली. नाही, माझे उपकार मानण्याची गरजच नाही, आणि 'मी उपकार करतो' असे जर मी मानले तर माझे प्रेम सरत जाईल. माझ्याकडून 'मी उपकार करतो' असे मानले जाऊ शकत नाही. म्हणजे यात स्वत:ला पूर्ण समजदारीपूर्वक राहावे लागते. संपूर्ण जागृतीत राहावे लागते.

अनासक्त हा तुमचा स्वत:चाच स्वभाव आहे. तुम्हाला काय वाटते? मी दिले आहे की तो तुमचा स्वत:चा स्वभावच आहे?

**प्रश्नकर्ता :** स्वत:चा स्वभावच आहे ना!

**दादाश्री :** हो, मग असे बोलना. हे तर सर्व 'दादांनी दिले, दादांनी दिले' असे म्हणाल तर केव्हा पार येईल?

**प्रश्नकर्ता :** परंतु याचे भान तर तुम्हीच करवून दिले ना?

**दादाश्री :** हो, पण भान करविले एवढेच! 'सर्व मी दिले आहे,' असे तुम्ही म्हणता, पण ते तुमचेच आहे आणि तेच तुम्हाला दिले आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, आमचे आहे ते तुम्ही दिले, परंतु आमचे होते असे आम्ही जाणतच नव्हतो ना!

**दादाश्री :** जाणत नव्हते परंतु जाणलेच ना शेवटी! जाणले त्याचा तर रुबाबच वेगळा ना! त्याचा कसा तर रुबाब असतो! नाही का? कोणी शिव्या दिल्या तरी रुबाब जात नाही. हो, केवढा रुबाब! आणि (ज्ञान नसेल) त्या रुबाबवाल्याचा? त्याचा आदर-सत्कार केला नाही तर तो अगदी हिरमुसतो. रिसेप्शनमध्ये त्याचा सत्कार करायचा राहून गेला तर हिरमुसतो!! सर्वांचा सत्कार केला आणि मी राहून गेलो. पाहा, तरी ह्या रुबाबात आणि त्या रुबाबात किती फरक आहे ते.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आधी जिथे आसक्त असू तिथेच नंतर अनासक्त होऊ.

**दादाश्री :** हो, हाच तर मार्ग आहे ना! हे सर्व त्याचे स्टेपिंगच आहेत. आणि शेवटी तर अनासक्त योगातच यायचे आहे.

## अभेद प्रेम तिथे बुद्धीचा अंत

भगवंत कसे आहेत? अनासक्त! कुठेही आसक्त नाहीत.

**प्रश्नकर्ता :** आणि ज्ञानी सुद्धा अनासक्तच आहेत ना?

**दादाश्री :** हो, म्हणूनच आमचे निरंतर प्रेम असते आणि ते सर्व ठिकाणी सारखेच, एकसमान प्रेम असते. शिव्या देईल त्याच्यावरही एकसमान आणि फुले वाहील त्याच्यावरही एकसमान. आणि फुले नाही वाहत त्याच्यावरही एकसमान प्रेम. आमच्या प्रेमात भेद पडत नाही, असे अभेद प्रेम आहे. म्हणजे तिथे बुद्धी नसते, बुद्धी निघून जाते. नेहमी, प्रेम आधी बुद्धीस तोडून टाकते किंवा मग बुद्धी प्रेमास आसक्त बनविते. म्हणजे बुद्धी असेल तिथे प्रेम नसतो आणि प्रेम असेल तिथे बुद्धी नसते. बुद्धी समाप्त झाली, म्हणजे अहंकारही समाप्त झाला. मग काही उरलेच नाही, आणि ममता नसेल तेव्हाच प्रेमस्वरूप होऊ शकेल. आम्ही तर अखंड प्रेमवाले! आम्हाला या देहावर ममता नाही. या वाणीवर ममता नाही आणि मनावरही ममता नाही.

## वीतरागतेतून प्रेमाचा उद्‌भव

खरे प्रेम कोठून आणायचे? तर अहंकार आणि ममता गेल्यानंतरच खरे प्रेम असते. अहंकार आणि ममता गेल्याशिवाय खरे प्रेम नसतेच कधी. खरे प्रेम हे वीतरागतेमधून उत्पन्न झालेली वस्तू आहे.

द्वंद्वातीत झाल्यानंतर वीतराग होतो. द्वैत आणि अद्वैत हे द्वंद्व आहे. द्वैत आणि अद्वैतवाल्यांना द्वैताचे विकल्प येतात. 'ते द्वैत, ते द्वैत, ते द्वैत'! त्यांना मग द्वैत चिकटते. पण तरी ते अद्वैत पद चांगले आहे. अद्वैतापासून तर अजून एक लाख मैल पुढे जाईल त्यानंतर वीतरागतेचे पद येईल आणि वीतरागतेचे पद आल्यानंतर आत प्रेम उत्पन्न होईल आणि तेव्हा जे प्रेम उत्पन्न होते ते म्हणजे परमात्म प्रेम. दोन चापट मारल्या तरी ते प्रेम घटत नाही आणि जर घटले तर आपण समजावे की ते प्रेम नव्हते.

समोरच्याचा धक्का आपल्याला लागला त्यास हरकत नाही, परंतु

आपला धक्का समोरच्यास लागणार नाही इतके आपण पाहावे तेव्हाच प्रेम संपादन होते. बाकी, प्रेम संपादन करायचे असेल तर ते असेच होत नाही.

हळूहळू सर्वांसोबत शुद्ध प्रेम स्वरूप व्हायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध प्रेम स्वरूप म्हणजे नक्की कशाप्रकारे राहायचे?

**दादाश्री :** एखादी व्यक्ती आता शिव्या देऊन गेली आणि नंतर ती व्यक्ती तुमच्याजवळ आली तरी तुमचे प्रेम घटत नाही, त्याचे नाव शुद्ध प्रेम. अशा प्रेमाचा धडा शिकायचा आहे, बस. दुसरे काही शिकायचे नाही. मी जे दाखवितो असे प्रेम असायला हवे. हे जीवन पूर्ण होईपर्यंत असे होईल ना? तेव्हा आता प्रेम शिका!

## रीत, प्रेम स्वरूप होण्याची

मुळात जग जसे आहे तसे तो समजेल, नंतर अनुभव करेल तर तो प्रेमस्वरूपच होईल. जग 'जसे आहे तसे' म्हणजे काय? तर कोणताही जीव किंचितमात्र दोषी नाही, जीवमात्र निर्दोषच आहे. कोणी दोषी दिसतो तो भ्रांतीमुळेच दिसतो.

चांगले दिसतात ती सुद्धा भ्रांती आणि दोषी दिसतात ती सुद्धा भ्रांती. दोन्ही अटॅचमेंट आणि डिटॅचमेंट (आकर्षण-विकर्षण) आहेत. म्हणजे खरोखर तर कोणी दोषी नाहीच आणि दोषी दिसतो त्यामुळे प्रेम होतच नाही. या जगासोबत जेव्हा प्रेम होईल, जेव्हा जग निर्दोष दिसेल तेव्हा प्रेम उत्पन्न होईल. हे 'तुझे-माझे' कुठपर्यंत वाटत असते? तर जोपर्यंत दुसऱ्यांना परके मानतो तोपर्यंत. त्यांच्याशी भेद आहे तोपर्यंत हे माझे वाटतात. म्हणून या अटॅचमेंटवाल्यांना माझे मानतो आणि डिटॅचमेंटवाल्यांना परके मानतो, कोणाशीही प्रेमस्वरूप राहत नाही.

प्रेम हा परमात्म गुण आहे, म्हणूनच त्या प्रेमामुळे आपले सर्व दु:ख विसरायला होतात. अर्थात प्रेमाने बांधले गेले म्हणजे मग दुसरे काही बांधण्याचे राहिले नाही.

प्रेम केव्हा उत्पन्न होते? तर आतापर्यंत ज्या चुका झाल्या असतील, त्यांची माफी मागून घेतली, तेव्हा प्रेम उत्पन्न होते.

त्यांचा एकही दोष झाला नाही, पण मला त्यांचा दोष दिसला म्हणून तो माझाच दोष होता.

ज्यांच्याशी प्रेम स्वरूप व्हायचे असेल, तिथे अशाप्रकारे वागावे. तेव्हा तुम्हाला प्रेम उत्पन्न होईल. प्रेम करायचे आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो दादा.

**दादाश्री :** आमची हीच पद्धत आहे. आम्ही ज्याप्रकारे तरलो त्याचप्रकारे सर्वांना तारतो.

तुम्हीही प्रेम उत्पन्न कराल ना? आपण प्रेम स्वरूप होतो तेव्हा समोरच्याला अभेदता वाटते. अशाच प्रकारे आमच्याशी सर्व अभेद झाले आहेत. ही रीत आम्ही उघड करून टाकली.

## सर्वांमध्ये 'मी' पाहतो, तो प्रेममूर्ती

आता जितका भेद मिटतो, तितके शुद्ध प्रेम उत्पन्न होते. शुद्ध प्रेम उत्पन्न होण्यासाठी आपल्यातून काय निघून जायला हवे? एखादी वस्तू निघेल तेव्हा ती दुसरी वस्तू येईल. व्हॅक्युम (शुन्यावकाश) राहू शकत नाही. म्हणजे यातून जेव्हा भेद जातो तेव्हा शुद्ध प्रेम उत्पन्न होते. अर्थात जितका भेद जातो तितके शुद्ध प्रेम उत्पन्न होते. संपूर्ण भेद मिटेल तेव्हा संपूर्ण शुद्ध प्रेम उत्पन्न होते. हीच रीत आहे.

तुम्हाला हा पॉइंट ऑफ व्ह्यू (दृष्टीकोन) समजला? हा वेगळ्या प्रकारचा आहे आणि प्रेममूर्ती व्हायचे आहे. सगळे एकच वाटतील, वेगळेपण वाटतच नाही. म्हणतील 'हे आमचे आणि हे तुमचे.' पण या जगातून जाते वेळी 'आमचे तुमचे' असते का? तर या रोगामुळेच वेगळेपण वाटते. हा रोग निघून गेला, तर प्रेममूर्ती होतो.

प्रेम म्हणजे हे सर्व 'मीच आहे' 'मीच' दिसत आहे. नाही तर 'तू' म्हणावे लागेल. 'मी' नाही दिसला, तर 'तू' दिसणार. दोघांपैकी एक

तर दिसलेच ना? व्यवहारात 'मी', 'तू' असे बोलावे पण दिसला पाहिजे 'मी'च ना! प्रेम स्वरूप म्हणजे काय? तर सर्व अभेदभावाने पाहणे, अभेदभावाने वागणे, अभेदभावाने चालणे, अभेदभावच मानणे. हे वेगळे आहेत अशा प्रकारच्या सर्व मान्यता काढून टाकाव्या. याचेच नाव प्रेमस्वरूप. एकच परिवार आहे असेच वाटते.

## ज्ञानीचे अभेद प्रेम

वेगळे न होणे. याचे नाव प्रेम. भेद न करणे, याचेच नाव प्रेम! अभेदता झाली तेच प्रेम. प्रेम ही नॉर्मालिटी म्हटली जाते. भेद असेल तर कोणी चांगले काम करून आले की, खुश होतो. परत थोड्यावेळाने काही चुकीचे झाले, चहाचे कप पडले तर चिडतो, म्हणजे अबॉव नॉर्मल, बिलो नॉर्मल होतच असते. प्रेम, काम पाहत नाही, मूळ स्वभावाचे दर्शन करते. काम तर, आपल्याला नॉर्मालिटीत प्रॉब्लेम होणार नाही, असेच काम होतात.

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आपल्याप्रति जो भाव जागृत होतो ते काय आहे?

**दादाश्री :** ही तर आमच्या प्रेमाची पकड आहे. आमच्या प्रेमाने तुम्हाला पकडले आहे. खरे प्रेम साऱ्या जगास पकडू शकते. प्रेम कुठे कुठे असते? तर जिथे अभेदता असते तिथे प्रेम असते. म्हणजे जगासोबत अभेदता केव्हा म्हटली जाते? प्रेमस्वरूप व्हाल तेव्हा. संपूर्ण जगासोबत अभेदता म्हटली जाते तिथे मग प्रेमाशिवाय दुसरे काहीच दिसत नाही.

आसक्ती केव्हा म्हटली जाते? तर जेव्हा कोणती संसारी वस्तू घ्यायची असेल तेव्हा. संसारी वस्तूचा हेतू असतो तेव्हा आणि ह्या खऱ्या सुखासाठी तर फायदा होईल, याची हरकत नाही. आमच्यावर जे प्रेम राहते याची हरकत नाही. ते तुम्हाला हेल्प करेल. दुसऱ्या आड जागेवर होणारे प्रेम उठून जाईल.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आमच्यात जागृत होणारा भाव, तो आपल्या हृदयाच्या प्रेमाचाच परिणाम आहे असेच ना?

**दादाश्री :** हो, प्रेमाचाच परिणाम आहे. म्हणजे प्रेमाच्या शस्त्रानेच शहाणे होतात. मला ओरडावे लागत नाही.

मी कोणासोबतही भांडू इच्छित नाही, माझ्याजवळ तर फक्त एक प्रेमाचेच शस्त्र आहे, 'मी प्रेमाने जगाला जिंकू इच्छितो.'

कारण मी सर्व शस्त्रे खाली ठेवून दिली आहेत. जग शस्त्रांमुळेच विरोधी होत असते, क्रोध-मान-माया-लोभ, ही शस्त्रे मी खालीच ठेवून दिली. म्हणजे ती मी वापरत नाही, मी प्रेमाने जगास जिंकू इच्छितो. जग जे समजते ते तर लौकिक प्रेम आहे. प्रेम तर त्याचे नाव की तुम्ही मला शिव्या दिल्या तर मी डिप्रेस होणार नाही आणि हार घालाल तर एलिवेट होणार नाही, त्यास प्रेम म्हटले जाते. खऱ्या प्रेमात तर कधीच फरक पडत नाही. या देहाच्या भावामध्ये फरक पडेल, परंतु शुद्ध प्रेमात फरक पडत नाही.

मनुष्य सुंदर असले तरी अहंकारामुळे कुरूप दिसतात. सुंदर केव्हा दिसतात ? तर म्हणे, प्रेमात्मा होतात तेव्हा, तेव्हा तर कुरूप देखील सुंदर दिसतो. शुद्ध प्रेम प्रकट होते तेव्हाच सुंदर दिसायला लागतो. जगातील लोकांना काय हवे आहे ? मुक्त प्रेम. ज्या प्रेमात स्वार्थाचा गंध किंवा कोणत्याही प्रकारचा मतलब नसतो.

हा तर निसर्गाचा कायदा आहे, नॅचरल लॉ! कारण प्रेम हे स्वत:च परमात्मा आहे.

## जिथे प्रेम तिथेच मोक्षमार्ग

अर्थात जिथे प्रेम दिसत नाही तिथे मोक्षाचा मार्गच नाही.तुम्हाला काहीच येत नसेल, बोलता देखील येत नसेल, तरी सुद्धा त्यांनी प्रेम लावले तरच खरे.

म्हणजे एक तर प्रामाणिकता आणि दुसरे प्रेम, की जे कधी कमी-जास्त होत नाही. या दोन्ही जागी भगवंत राहतात. कारण जिथे प्रेम आहे, निष्ठा आहे, पवित्रता आहे, तिथेच भगवंत आहेत.

पूर्ण 'रिलेटिव्ह डिपार्टमेंट' पार केल्यानंतर निरालंब होतो, तेव्हा प्रेम उत्पन्न होते. ज्ञान कुठे खरे असते? तर जिथे प्रेमाने काम घेतले जात असेल तिथे. शिवाय प्रेम असेल तिथे देणेघेणे होत नाही. प्रेम असेल तिथे एकता असते. जिथे फी असते तिथे प्रेम नसते. लोक फी ठेवतात ना पाच-दहा रुपये? की 'या, तुम्हाला ऐकायचे असेल तर इथे या, इथे नऊ रुपये फी आहे,' असे म्हणतात. म्हणजे हा धंदाच झाला! तिथे प्रेम नसते. रुपये असतील तिथे प्रेम नसते. दुसरे जिथे प्रेम आहे तिथे ट्रिक (लबाडी) नसते. आणि जिथे ट्रिक आहे तिथे प्रेम नसते.

ज्यावर झोपेल त्याचाच आग्रह होतो, चटईवर झोपत असेल तर चटईचा आग्रह होतो आणि डनलोपच्या गादीवर झोपत असेल तर त्याचा आग्रह होता. चटईवर झोपण्याचा आग्रह करणाऱ्याला गादीवर झोपवाल तर त्याला झोप लागणार नाही. आग्रह हेच विष आहे आणि निराग्रहता हेच अमृत आहे. जोपर्यंत निराग्रहीपण उत्पन्न होत नाही तोपर्यंत जगाचे प्रेम संपादन होत नाही. शुद्ध प्रेम निराग्रहतेमुळे प्रकट होते आणि शुद्ध प्रेम हेच परमेश्वर आहे.

म्हणजे प्रेम स्वरूप केव्हा होता येईल? तर नियम-बियम वगैरे काही शोधणार नाही तेव्हा. जर नियम शोधाल तर प्रेम स्वरूप होता येणार नाही. 'का उशिरा आलात?' म्हटले तर ते प्रेमस्वरूप म्हटले जात नाही आणि जेव्हा प्रेम स्वरूप व्हाल तेव्हा लोक तुमचे ऐकतील. हो, तुम्ही आसक्तीवाले तर तुमचे कोण ऐकेल? तुम्हाला पैसे हवेत, तुम्हाला दुसऱ्या स्त्रिया हव्यात, ती आसक्तीच म्हटली जाईल ना? शिष्य गोळा करणे ती सुद्धा आसक्तीच म्हटली जाईल ना?

## प्रेमात इमोशनलपणा नाही!

**प्रश्नकर्ता :** हे जे प्रेमस्वरूप आहे ते सुद्धा असे म्हटले जाते की, ते हृदयातून येत असते आणि इमोशनलपणा (भावनिकता) सुद्धा हृदयातूनच येत असते ना?

**दादाश्री :** नाही, ते प्रेम नाही, प्रेम तर शुद्ध प्रेम असले पाहिजे.

ट्रेनमध्ये सगळी माणसे बसली असतील आणि ट्रेन इमोशनल झाली तर काय होईल?

**प्रश्नकर्ता :** गडबड होईल, एक्सिडेंट हाईल.

**दादाश्री :** लोक मरतील. त्याचप्रमाणे ही माणसे जेव्हा इमोशनल होतात तेव्हा (शरीराच्या) आत इतके सारे जीव मरतात आणि त्याची जबाबदारी स्वत:वर येते. इमोशनल झाल्यामुळे अशा अनेक प्रकारच्या जबाबदाऱ्या येतात.

**प्रश्नकर्ता :** इमोशन नसलेला मनुष्य दगडासारखा नाही का होणार?

**दादाश्री :** मी इमोशनल नाही, मग मी काय दगडासारखा वाटतो? माझ्यात अजिबात इमोशन नाही. इमोशन असलेला मिकेनिकल होऊन जातो. पण मोशनवाला मिकेनिकल होत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** पण जर स्वत:चे 'सेल्फ रियलाईज' झाले नसेल, तर मग इमोशन नसलेला माणूस दगडासारखाच वाटेल ना?

**दादाश्री :** असे नसतेच. असे होतच नाही ना. असे कधीच होत नाही, नाही तर मग त्याला मेंटल हॉस्पिटलला घेऊन जातात. पण ते मेंटल सुद्धा इमोशनलच असतात. संपूर्ण जगच इमोशनल आहे.

## अश्रुने जो व्यक्त होतो, तो नाही खरा जिव्हाळा

**प्रश्नकर्ता :** संसारात राहण्याकरिता जिव्हाळ्याची गरज आहे. जिव्हाळा व्यक्त करावाच लागतो. जिव्हाळा व्यक्त केला नाही तर कठोर म्हणतात. परंतु आता ज्ञान मिळाले, ज्ञानाची समज आत उतरली त्यानंतर जिव्हाळा तितका व्यक्त केला जात नाही. तर आता व्यवहारात जिव्हाळा व्यक्त करावा का?

**दादाश्री :** काय घडते ते पाहायचे.

**प्रश्नकर्ता :** उदाहरणार्थ मुलगा परदेशी शिकायला जात असेल तेव्हा एयरपोर्टवर आई आणि वडील दोघेही गेले आईच्या डोळ्यातून अश्रू

वाहिले पण वडील रडले नाहीत. म्हणून तू कठोर दगडासारखा आहेस असे म्हणतात.

**दादाश्री :** नाही, जिव्हाळा असा नसतो. परदेशी जात असेल तरी काय? जर तिच्या डोळ्यात अश्रू येत असतील तर तिला दटावले पाहिजे की, मोक्षाला जायचे असेल तर इतकी हळवी कुठवर राहशील?

**प्रश्नकर्ता :** नाही, म्हणजे असे की जिव्हाळा नसेल तर मनुष्य फार कठोर होऊन जातो. जिव्हाळा नसलेला मनुष्य फार कठोर असतो.

**दादाश्री :** ज्याच्या डोळ्यात अश्रू येत नाहीत त्याचाच खरा जिव्हाळा आहे आणि तुमचा जिव्हाळा खोटा आहे. तुमचा जिव्हाळा दिखाव्याचा आहे आणि त्याचा जिव्हाळा खरा आहे. खरा जिव्हाळा हार्टिली असतो. हे सर्व चुकीचे धरून बसले आहेत. जिव्हाळा काही बळजबरीने होत नसतो. ती तर नेचरल गिफ्ट आहे. जर असे म्हणत असतील की कठोर दगडासारखा आहे तर जिव्हाळा उत्पन्न होत असेल तोही बंद होतो. हे रडणे आणि मग लगेच विसरून जाणे त्यास जिव्हाळा म्हटले जात नाही. जिव्हाळा तर रडू सुद्धा न येणे आणि आठवण राहणे तोच खरा जिव्हाळा.

आमचा जिव्हाळा तर असा की आम्ही कधीच रडत नाही पण तरीही सर्वांवर आमचा कायमचाच जिव्हाळा. कारण जितके अधिक लोक भेटतात तितके सर्व तर रोज आमच्या ज्ञानात येतच असतात.

**प्रश्नकर्ता :** आई-वडील स्वत:च्या मुलांवर ज्या प्रकारे जिव्हाळा व्यक्त करतात, तेव्हा बऱ्याचदा असे वाटते की ते अति प्रमाणात व्यक्त करतात.

**दादाश्री :** ते सर्व इमोशनलच आहे. कमी दाखवणारे देखील इमोशनल म्हटले जातात. नॉर्मल असायला हवे. नॉर्मल म्हणजे फक्त नाटकीय! नाटकातील बायकोसोबत नाटक करणे, तो अगदी तंतोतंत, एकजॅक्ट. लोकांना त्यात कुठेही चूक दिसणार नाही. पण मग त्या नाटकातील बायकोला बाहेर निघताना सांगितले की आता तू चल

माझ्याबरोबर, तर ती काही येणार नाही. ती म्हणेल हे तर नाटकापुरतेच होते. कळतंय का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** हो कळतंय.

**दादाश्री :** म्हणजे मुलाला म्हणावे 'ये बेटा, बैस इथे.' तुझ्याशिवाय माझे आहे तरी कोण? आम्ही तर हिराबांना(दादाश्रींची पत्नी) म्हणत होतो की मला तुमच्याशिवाय करमत नाही. मी परदेशी जातो पण तुमच्याशिवाय मला करमत नाही.

**प्रश्नकर्ता :** हिराबांनाही ते खरेच वाटायचे.

**दादाश्री :** हो, ते खरेच असते. पण त्यास आम्ही आत शिवू देत नाही.

**प्रश्नकर्ता :** पूर्वीच्या काळी आई-वडिलांना मुलांवर प्रेम करण्यासाठी किंवा त्यांची काळजी घेण्यासाठी वेळच नसायचा आणि प्रेम देतही नव्हते. जास्त लक्ष देत नसत. हल्ली तर आई-वडील मुलांना फार प्रेम देतात, खूपच काळजी घेतात, सर्व काही करतात तरी सुद्धा मुलांना आई-वडिलांवर जास्त प्रेम का नसते?

**दादाश्री :** हे प्रेम तर, आजकाल बाहेरचा मोह इतका जागृत झाला आहे की त्यातच त्यांचे सगळे चित्त जाते. पूर्वी मोह फार कमी होता आणि आज तर मोहाचे पुष्कळ स्थान झाले आहेत.

**प्रश्नकर्ता :** हो, आणि आई-वडील सुद्धा प्रेमाचे भुकेले असतात की ही आमची मुले आहेत, त्यांनी विनय वगैर ठेवावा.

**दादाश्री :** प्रेमच, जग प्रेमाधीन आहे, मनुष्यास जितकी भौतिक सुखाची पर्वा नाही तितकी प्रेमाची पर्वा आहे. परंतु प्रेमात संघर्ष होतच राहतात. काय करणार? प्रेमात संघर्ष होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** मुलांना आई-वडिलांवर खूपच प्रेम आहे.

**दादाश्री :** मुलांना सुद्धा खूप प्रेम आहे! पण तरीही संघर्ष होतातच.

## आसक्ती, तोपर्यंत टेन्शन

**प्रश्नकर्ता :** जितका जिव्हाळा जास्त, तितके त्याचे प्रेम अधिक आहे, अशी समज आहे.

**दादाश्री :** ते प्रेमच नसते ना! ती सर्व आसक्ती आहे. या जगात प्रेम हा शब्दच नाही. तेव्हा प्रेम बोलणे हे चुकीचे आहे. ती आत आसक्ती असते.

**प्रश्नकर्ता :** तर हा जिव्हाळा आणि जिव्हाळ्याचा अतिरेक हे समजावण्याची कृपा करावी.

**दादाश्री :** जिव्हाळा आणि जिव्हाळ्याचा अतिरेक यास इमोशनल (भावूकता) म्हटले जाते. मनुष्य मोशनमध्ये राहू शकत नाही, म्हणून इमोशनल होतो.

किंचितही जिव्हाळा आहे, आसक्ती आहे, तोपर्यंत माणसाला 'टेन्शन' उत्पन्न होते आणि टेन्शनमुळे चेहरा उतरलेला असतो. आमच्यात प्रेम आहे म्हणून तर आम्ही बिनटेन्शनचे राहू शकतो. दुसरा कोणी टेन्शनशिवाय राहूच शकत नाही! सर्वांनाच टेन्शन असते, संपूर्ण जग टेन्शनवालेच आहे.

## जिव्हाळ्याचा प्रवाह ज्ञानींना

आम्हा ज्ञानीपुरुषांना जिव्हाळा असतो. हो, जसा असायला हवा तसाच असतो. आम्ही त्यास 'होम' ला (आत्म्याला) शिवूही देत नाही. असा नियम नाही की आत 'होम मध्ये' शिवू द्यावे. जिव्हाळा नसेल तर त्याला मनुष्यच कसे म्हणाल?

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणालात की जिव्हाळा तर आम्हालाही असतो. तुम्हाला जसा असतो त्यापेक्षा आमचा उच्च प्रकारचा असतो, सर्वांसाठीच असतो.

**दादाश्री :** जिव्हाळा तर असतो. आम्ही बिनजिव्हाळ्याचे नसतो.

**प्रश्नकर्ता :** पण तरी तो जिव्हाळा तुम्हाला टच होत नाही.

**दादाश्री :** जिथे नैसर्गिक रित्या ठेवायला हवे तिथेच आम्ही त्यास ठेवतो आणि तुम्ही अनैसर्गिक ठिकाणी ठेवता.

**प्रश्नकर्ता :** ही डिमार्केशन जरा स्पष्ट करा ना?

**दादाश्री :** 'फॉरेन' ची गोष्ट फॉरेनमध्येच ठेवायची ना, 'होम' मध्ये आणायची नाही. लोक 'होम' मध्ये आणतात. 'फॉरेन'ची गोष्ट फॉरेनमध्ये ठेऊन स्वत: 'होम'मध्ये शिरायचे.

**प्रश्नकर्ता :** पण मग जेव्हा त्या जिव्हाळ्याचा प्रवाह असतो तेव्हा 'त्याला' 'फॉरेन' आणि 'होमचे' (आत्मा आणि अनात्म्याचे)डिमार्केशन होऊ देत नाही ना? त्याक्षणी दोन भाग वेगळे पडत नाहीत ना?

**दादाश्री :** ज्यांनी 'ज्ञान' घेतले असेल, त्यांना का वेगळे करता येणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण हे कशाप्रकारे 'अप्लाय' करता. ते मला समजायचे आहे.

**दादाश्री :** आम्ही जिव्हाळ्यास 'फॉरेन' मध्ये ठेऊन 'होम' मध्ये (आत्म्यात) शिरतो आणि तो जिव्हाळा जर आत घुसत असेल तर त्यास म्हणतो, 'बाहेर बस.' आणि तुम्ही तर म्हणाल 'ये, भाऊ, ये, ये, आत ये,'

## 'आत शिवू देत नाही,' याचा परिणाम...

आम्हाला हे सगळे जण म्हणतात की 'दादा' तुम्ही आमची खूप चिंता करता, नाही का? बरोबर आहे. पण त्यांना हे माहीत नाही की दादा चिंतेला शिवूही देत नाहीत. कारण चिंता करणारा मनुष्य काहीच करू शकत नाही. निर्वीर्य होऊन जातो. चिंता करत नसाल, तर सर्व काही करू शकता. चिंता करणारा मनुष्य तर संपूनच जातो. तेव्हा हे सर्व म्हणतात, ती गोष्ट खरी आहे. आम्ही सुपरफ्लुअस (वरवर)सर्व काही करतो पण आत शिवू देत नाही.

**प्रश्नकर्ता :** खरोखर तुम्ही काहीच करत नाही? कोणी महात्मा दु:खात असेल तर तुम्ही काहीच करत नाही का?

**दादाश्री :** करतो ना! परंतु ते 'सुपरफ्लुअस' आत शिवू देत नाही. बाहेरच्या भागाचे सर्वच पूर्ण करून घेतो. बाहेरच्या भागात सर्व प्रयोग पूर्ण होऊ द्यायचे. पण चिंता मात्र करायची नाही. चिंतेमुळे तर सर्व बिघडते. तुम्ही काय म्हणता? मी चिंता करावी असे म्हणायचे आहे का तुम्हाला?

शिवू दिले तर ते काम होणारच नाही. जगात सर्वांनाच शिवत असते ना! आत शिवते म्हणून तर जगाचे काम होत नाही. आम्ही आत शिवू देत नाही म्हणून काम होते. शिवू देत नाही म्हणूनच आमचीही सेफसाईड आणि त्याची सुद्धा सेफसाईड, शिवायला द्यायचे नाही हे तुम्हाला आवडले का? तुम्ही तर शिवू दिलेले, नाही का?

आम्ही तर हिशोब पाहून घेतला की आम्ही शिवू दिले तर इथे निर्वीर्य होईल आणि त्याचे काम होणार नाही. आणि जर शिवू दिले नाही, तर आत्मवीर्य प्रकट होईल आणि त्याचे काम होईल.

हे विज्ञान प्रेमस्वरूप आहे, प्रेमात क्रोध-मान-माया-लोभ वगैरे काहीही नसते. ते असेपर्यंत प्रेम नसते.

## सात्विक नाही, शुद्ध प्रेम आहे 'हे'

**प्रश्नकर्ता :** आजकाल जगात सर्वच शुद्ध प्रेमासाठी तळमळत असतात.

**दादाश्री :** शुद्ध प्रेमाचाच हा मार्ग आहे. आपले जे विज्ञान आहे ना, त्यात कुठलीही, कोणत्याही प्रकारची इच्छा नाही, म्हणजे शुद्ध प्रेमाचा हा मार्ग इथे उद्‌भवला आहे. नाही तर या काळात हे शक्यच नाही. परंतु या काळात उत्पन्न झाला, ते एक आश्चर्यच घडले आहे.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध प्रेम आणि सात्विक प्रेमातला फरक समजवा ना.

**दादाश्री :** सात्विक प्रेम अहंकार सहित असते आणि शुद्ध प्रेमात

तर अहंकार सुद्धा नसतो. सात्विक प्रेमात फक्त अहंकारच असतो. त्यात लोभ नसतो, कपट नसते, त्यात फक्त मानच असतो. अहम् – मी आहे, बस एवढेच! म्हणजे स्वत:ला अस्तित्वाचे भान असते, आणि शुद्ध प्रेमात तर स्वत: (आत्म्यात) अभेद स्वरूप झालेला असतो.

**प्रश्नकर्ता :** परंतु असे आहे का की कोणत्याही क्रियेमध्ये, मग ती सात्विक क्रिया असो, रजोगुणी क्रिया असो किंवा कुठल्याही प्रकारची क्रिया असो, त्या क्रियेत अहंकाराचे तत्व नसते. हे तार्किक रित्या खरे आहे का?

**दादाश्री :** ते शक्य नाही. अरे, असे करायला गेलो तर ती चूक आहे. कारण अहंकाराशिवाय क्रिया होतच नाही. सात्विक क्रिया सुद्धा होत नाही.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध प्रेम ठेवायला तर हवे ना? मग ते अहंकाराशिवाय धारण कसे काय होईल? अहंकार आणि शुद्ध प्रेम दोन्ही एकत्र राहू शकत नाही?

**दादाश्री :** अहंकार आहे तोपर्यंत शुद्ध प्रेम उत्पन्नच होत नाही ना! अहंकार आणि शुद्ध प्रेम दोन्ही एकत्र राहू शकत नाही. शुद्ध प्रेम केव्हा येते? अहंकार विलय होऊ लागतो तेव्हापासून शुद्ध प्रेम येऊ लागते आणि अहंकार संपूर्ण विलय झाला की मग शुद्ध प्रेमाची मूर्ती बनतो. शुद्ध प्रेमाची मूर्ती परमात्मा आहे. तिथे आपले सर्व प्रकारे कल्याण होते. ते निष्पक्षपाती असते. कोणताही पक्षपात नसतो. शास्त्रांच्या पलीकडे असते. चार वेद शिकून झाल्यावर वेद 'इट सेल्फ' बोलतात की धिस इज नॉट दॅट, धिस इज नॉट दॅट, तर 'ज्ञानी पुरुष' म्हणतात की धिस इज दॅट, बस! ज्ञानी पुरुष तर शुद्ध प्रेमवाले, म्हणून, ताबडतोब आत्मा देतात.

त्यांच्यात फक्त दोन गुण आहेत. शुद्ध प्रेम आहे आणि शुद्ध न्याय आहे. त्यांच्यात हे दोन गुण आहेत. आणि या जगात जेव्हा शुद्ध न्याय असेल, तेव्हा समजायचे की ही भगवंताची कृपा अवतरली. शुद्ध न्याय! नाही तर हे दुसरे न्याय तर सापेक्ष न्याय आहेत.

## प्रेम प्रकटविते आत्म ऐश्वर्य

करुणा हा सामान्य भाव आहे आणि तो सर्वत्र वर्तत असतो की सांसारिक दु:खांमुळे हे जग फसलेले आहे आणि ती दु:खं दूर कशी होतील?

**प्रश्नकर्ता :** मला जरा प्रेम आणि करुणेचा काय संबंध आहे हे समजायचे आहे.

**दादाश्री :** करुणा, काही खास दृष्टीने असेल तेव्हा करुणा म्हटली जाते. आणि दुसऱ्या कुठल्या दृष्टीने असेल तेव्हा प्रेम म्हटले जाते. करुणेचा उपयोग केव्हा करतात? सामान्य भावे सर्वांचे दु:ख स्वत: पाहू शकतो, तिथे करुणा असते. करुणा म्हणजे काय? तर ती एक प्रकारची कृपा आहे आणि प्रेम ही वेगळी वस्तू आहे. प्रेमास तर विटामिन म्हटले जाते. असे प्रेम पाहिले की त्याच्यात विटामिन उत्पन्न होते, आत्मविटामिन. देहाचे विटामिन तर पुष्कळ दिवस खाल्ले, परंतु आत्म्याचे विटामिन चाखले नाही ना? त्याच्यात आत्मवीर्य प्रकट होते. ऐश्वर्य पण प्रकट होते.

**प्रश्नकर्ता :** हे सहजच होते ना दादा?

**दादाश्री :** सहजच.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे त्यासाठी त्याला काहीच करावे लागत नाही.

**दादाश्री :** काहीच नाही. हा मार्गच सहज आहे.

## शिव्या देणाऱ्यावरही प्रेम!

**प्रश्नकर्ता :** या ज्ञानानंतर आम्हाला जो अनुभव होतो, त्यात असे प्रेम, प्रेम आणि प्रेमच उफाळत असते, ते काय आहे?

**दादाश्री :** तो प्रशस्त राग आहे, या रागामुळे संसारातील सर्व राग (मोह) सुटतात. असा राग उत्पन्न होतो तेव्हा संसारात इतर जागी जिथे जिथेही राग पसरलेले आहेत ते सर्व परततात. यास भगवंताने प्रशस्त राग म्हटले आहे. प्रशस्त राग, हे प्रत्यक्ष मोक्षाचे कारण आहे. या रागामुळे

बंधन होत नाही. कारण या रागात संसारी हेतू नाही. उपकार करणाऱ्यावर राग उत्पन्न होतो, तो प्रशस्त राग, तो सर्व रागांना सोडवणारा आहे.

या 'दादांचे' निदिध्यासन केले तर त्यांच्यात जे गुण आहेत ते आपल्यात उत्पन्न होतात. दुसरे असे की जगातील कोणत्याही वस्तूची स्पृहा करू नये. भौतिक वस्तूची स्पृहा करू नये. आत्म सुखाचीच कामना करायची. दुसरी कोणतीही कामना करू नये. आणि ज्याने तुम्हाला शिव्या दिल्या असतील त्याच्यावरही प्रेम. इतके असेल तर मग कामच झाले.

## ज्ञानी बेजोड प्रेमावतार

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा असे होते की झोपलेले असतो आणि थोडी अर्धजागृत अवस्थाही असते आणि 'दादा' आत शिरतात. 'दादां'चेच सुरु होऊन जाते, ते काय आहे ?

**दादाश्री :** हो, सुरु होऊन जाते. असे आहे ना, 'दादा' सूक्ष्म भावे संपूर्ण जगात फिरत असतात. मी स्थूलभावे इथे असतो आणि दादा सूक्ष्मभावे साऱ्या जगात फिरत असतात. सगळीकडेच लक्ष ठेवतात. आणि असे नाही की कोणाबरोबर काही भानगड आहे.

म्हणून पुष्कळ लोकांच्या स्वप्नात येतच असतात, आपोआपच. कित्येक तर दिवसासुद्धा 'दादांशी' वार्तालाप करतात. ते मग मला सांगतात ही की दादा तुम्ही माझ्याशी असा वार्तालाप केला! दिवसा, उघड्या डोळ्यांनी त्याला दादा सांगतात आणि तो ऐकतो आणि लिहूनही घेतो. आठ वाजता लिहून घेतो की दादा इतके बोलले आहेत. ते मग मला वाचून सुद्धा दाखवतात.

म्हणजे असे सर्व घडतच असते. पण तरी यात चमत्कारासारखे काहीच नाही. हे स्वाभाविक आहे. कोणत्याही मनुष्याची आवरणरहित स्थिती झाली असेल आणि थोडे फार केवळ ज्ञानास अंतराय करतील इतके आवरण राहिले असेल आणि जगात ज्याचे उदाहरण सापडणार नाही असे प्रेम उत्पन्न झाले असेल, ज्याचे उदाहरण सापडणार नाही असा अद्वितीय प्रेमावातर झाला असेल, तिथे सर्व काही घडते.

आता नि:स्पृह प्रेम असते, पण ते अहंकारी पुरुषाला असते. म्हणून आत अहंकार शोषून घेतो की नाही? घेतोच. म्हणजे त्यात तो संपूर्ण नि:स्पृह राहू शकत नाही. अहंकार गेल्यानंतर खरे प्रेम असते.

म्हणजे हा प्रेमावतार आहे. तेव्हा कोणाच्याही मनात जरासाही गोंधळ निर्माण झाला की तिथे ते स्वत: येऊन हजर!

## प्रेम, सर्वांवर सारखेच

हे प्रेम तर ईश्वरीय प्रेम आहे. असे सगळीकडे नसते ना! हे तर क्वचित ठिकाणी असे असेल तरच असते, नाही तर शक्यच नाही ना!

आम्हाला तर शरीराने जाड दिसतो त्याच्यावर सुद्धा प्रेम, गोरा दिसतो त्याच्यावरही प्रेम, काळा दिसतो त्याच्यावरही प्रेम, लुळा-पांगळा दिसतो त्याच्या वरही प्रेम, सुदृढ मनुष्य असेल त्याच्यावरही प्रेम, सर्वांवर सारखेच प्रेम दिसते. कारण आम्ही त्याच्या आत्म्यालाच पाहतो. दुसरी वस्तू पाहतच नाही. जसे संसारात लोक मनुष्याचे कपडे पाहत नाहीत, त्याचे गुण कसे आहेत ते पाहतात. त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुष या पद्गलला पाहत नाही, पुद्गल तर कोणाचे अधिक असते, तर कोणाचे कमी असते. याचा काही नेम नाही ना!

आणि असे प्रेम असेल तिथे लहान मुले सुद्धा बसून राहतात. अशिक्षित बसून राहतात. शिक्षित बसून राहतात. बुद्धिवान बसून राहतात. सर्व लोक सामावले जातात. मुले तर इथून उठतच नाहीत, कारण वातावरणच इतके सुंदर असते.

## असे प्रेम स्वरूप 'ज्ञानीं'चे

म्हणजे प्रेम तर 'ज्ञानी' पुरुषाचेच पाहण्यासारखे आहे! आज पन्नास हजार लोक बसले आहेत परंतु कोणताही मनुष्य सहजही प्रेम रहित झाला नसेल. त्या प्रेमानेच जगत आहेत सर्व.

**प्रश्नकर्ता :** हे तर फार कठीण आहे.

**दादाश्री :** परंतु आमच्यात तसे प्रेम प्रकट झाले आहे. तेव्हा बरेच

लोक आमच्या प्रेमामुळेच जगत आहेत. निरंतर दादा, दादा, दादा! खाण्यास नाही मिळाले तरी हरकत नाही. म्हणजे प्रेम ही अशी वस्तू आहे.

आता या प्रेमानेच त्यांची पापं भस्मसात होतात. नाही तर ही कलियुगातील पापं कशी धुतली जातील?

## तरी राहिला फरक चतुर्दशी आणि पौर्णिमेत

म्हणजे जगात कधीही पाहिले नसेल, तसे प्रेम उत्पन्न झाले आहे. कारण प्रेम उत्पन्न झाले होते, पण तिथे ते वीतराग झाले होते. जिथे प्रेम उत्पन्न होईल अशी जागा होती, तिथे ते संपूर्ण वीतराग होते. म्हणून तिथे प्रेम दिसत नव्हते. आम्ही कच्चे पडलो म्हणून प्रेम राहिले पण संपूर्ण वीतरागता आली नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण म्हणालात ना की आम्ही प्रेम स्वरूप झालो पण तेव्हा संपूर्ण वीतरागता उत्पन्न झाली नाही. हे जरा समजायचे होते.

**दादाश्री :** प्रेम म्हणजे काय? तर कोणाबद्दल किंचितमात्रही भाव बिघडत नाही, त्याचे नाव प्रेम. संपूर्ण वीतरागता म्हणजेच प्रेम.

**प्रश्नकर्ता :** तर प्रेमाचे स्थान नक्की कुठे आहे? इथे कोणत्या स्थितीत प्रेम म्हटले जाईल?

**दादाश्री :** प्रेम तर, जितके वीतराग झालात तितके प्रेम उत्पन्न झाले. संपूर्ण वीतराग म्हणजे संपूर्ण प्रेम! म्हणजे वितद्वेष तर तुम्ही सर्व झालातच. आता प्रत्येक बाबतीत हळूहळू वीतराग होत जाल तसतसे प्रेम उत्पन्न होत राहिल.

**प्रश्नकर्ता :** तर इथे आपण म्हणालात की आमचे प्रेम म्हटले जाते, पण वीतरागता नाही आली, म्हणजे काय?

**दादाश्री :** वीतरागता म्हणजे आमचे प्रेम आहे, ते असे दिसून येते आणि या वितारागांचे प्रेम असे दिसत नाही. परंतु खरे प्रेम तर त्यांचेच म्हटले जाते आणि आमचे प्रेम लोकांना दिसते. परंतु ते खरे प्रेम म्हटले जात नाही. एक्जॅक्टली (खरोखर) ज्याला प्रेम म्हटले जाते ना, ते म्हणता

येणार नाही, एक्जॅक्टली तर संपूर्ण वीतरागता असेल तेव्हा खरे प्रेम, आणि आमचे तर अजून चतुर्दशी म्हटली जाते. पौर्णिमा नाही!!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे पौर्णिमावाल्याचे प्रेम यापेक्षाही अधिक असते?

**दादाश्री :** पौर्णिमावाल्याचेच खरे प्रेम! चतुर्दशीवाल्यामध्ये काही ठिकाणी कमतरता असते. तेव्हा पौर्णिमावाल्याचेच खरे प्रेम असते.

**प्रश्नकर्ता :** संपूर्ण वीतरागता असेल आणि बिनप्रेमाचा असेल, असे तर शक्यच नाही ना?

**दादाश्री :** ते बिनप्रेमाचे नसतातच ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे दादा चतुर्दशी आणि पौर्णिमेत एवढा फरक असतो? एवढा सारा फरक?

**दादाश्री :** बराच फरक! हे तर आपल्याला पौर्णिमेसारखे वाटते परंतु बराच फरक आहे! आमच्या हातात आहे तरी काय? आणि त्यांच्या, तीर्थंकरांच्या हातात तर सर्व काही आहे. आमच्या हातात काय आहे!! पण तरीही आम्हाला पौर्णिमेसारखे समाधान वाटते! आमची शक्ती, स्वत:साठी इतके काम करीत असते की आम्हाला पौर्णिमा झाल्यासारखेच वाटते!!

## ज्ञानी बांधले गेले प्रेमाने

**प्रश्नकर्ता :** आता हे ज्ञान घेतल्यानंतर दोन तीन जन्म बाकी राहतील तर तितक्या काळापर्यंत तर संपूर्ण करुणा-सहाय्य करण्याकरिता तुम्ही बांधलेले आहातच ना?

**दादाश्री :** बांधलेले आहोत म्हणजे आम्ही प्रेमाने बांधलेले आहोत. तुम्ही जोपर्यंत प्रेम ठेवाल तोपर्यंत आम्ही बांधलेले आहोत. तुमचे प्रेम सुटले की आम्ही सुटलो. आम्ही प्रेमाने बांधलेलो आहोत.तुमचे प्रेम संसाराकडे वळले तर तुम्ही आमच्यापासून वेगळे व्हाल आणि जर आत्म्यासाठी प्रेम राहिले तर आम्ही बांधलेले आहोत. काय वाटते? बांधलेले तर आहोतच ना! प्रेमाने तर बांधलेलेच आहोत ना!

## शुद्ध प्रेम स्वरूप, तोच परमात्मा

अहंकारी व्यक्तीला खुश करायला वेळच लागत नाही. गोड-गोड बोलाल तरीही खुश होऊन जातो आणि ज्ञानी तर गोड बोलाल तरी खुश होत नाहीत. कोणतेही साधन, जगात अशी कोणतीही वस्तू नाही की ज्यामुळे 'ज्ञानी' खुश होतील. फक्त आपल्या प्रेमानेच खुश होतील. कारण ते एकटेच प्रेमवाले आहेत. त्यांच्याजवळ प्रेमाशिवाय दुसरे काही नाहीच. संपूर्ण जगासाठी त्यांना प्रेम आहे.

ज्ञानी पुरुषांचे शुद्ध प्रेम जे दिसते, असे उघड-उघड दिसते, तोच परमात्मा. परमात्मा, ही दुसरी कोणती वस्तूच नाही. शुद्ध प्रेम जे दिसते, जे वाढत नाही, घटत नाही, एकसमानच राहते, त्याचेच नाव परमात्मा, उघड-उघड परमात्मा! आणि ज्ञान हा सूक्ष्म परमात्मा आहे, ज्ञान समजण्यास वेळ लागेल. म्हणून परमात्मा शोधण्यासाठी बाहेर जायचे नाही. बाहेर तर सर्व आसक्ती आहे.

**-जय सच्चिदानंद**

## प्रतिक्रमण विधी

प्रत्यक्ष दादा भगवानांच्या साक्षीने देहधारी... (ज्याच्या प्रति दोष झाला असेल त्या व्यक्तिचे नाव) च्या मन-वचन-कायेचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्माहून भिन्न असे हे शुद्धात्मा भगवान! आपल्या साक्षीने, आजच्या दिवसापर्यंत जे जे ★★ दोष झाले आहेत, त्यांची क्षमा मागत आहे, हृदयपूर्वक खूप पश्चाताप करीत आहे. मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा. आणि पुन्हा असे दोष कधीही करणार नाही, असा दृढ निश्चय करीत आहे, त्यासाठी मला परम शक्ती द्या.

★★ क्रोध-मान-माया-लोभ, विषय-विकार, कषाय इत्यादीपासून त्या व्यक्तीला दु:खं दिले गेले असेल, त्या सर्व दोषांना मनात आठवायचे.

## शुद्धात्म्या प्रति प्रार्थना

**( दररोज एक वेळा बोलायची )**

हे अंतर्यामी परमात्मा! आपण प्रत्येक जीवमात्रांमध्ये विराजमान आहात, तसेच माझ्यामध्ये पण विराजमान आहात, आपले स्वरूप हेच माझे स्वरूप आहे, माझे स्वरूप शुद्धात्मा आहे.

हे शुद्धात्मा भगवान! मी आपल्याला अभेदभावे अत्यंत भक्तिपूर्वक नमस्कार करीत आहे.

अज्ञानतेमुळे मी जे जे ★★दोष केले आहेत, त्या सर्व दोषांना आपल्या समक्ष जाहीर करीत आहे. त्यांचा हदयपूर्वक खूप पश्चाताप करीत आहे आणि आपल्याजवळ क्षमा प्रार्थित आहे. हे प्रभू! मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा आणि पुन्हा असे दोष करू नये अशी आपण मला शक्ती द्या, शक्ती द्या, शक्ती द्या.

हे शुद्धात्मा भगवान ! आपण अशी कृपा करा की आमचे भेदभाव मिटून जावेत आणि अभेद स्वरूप प्राप्त व्हावे. आम्ही आपल्यात अभेद स्वरूपाने तन्मायाकार राहू.

★★ (जे जे दोष झाले असतील ते मनात जाहीर करावे.)



## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार

**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे, पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421. फोन : (079) 39830100

**राजकोट** : **त्रिमंदिर**, अहमदाबाद-राजकोट हाईवे, तरघड़िया चोकड़ी (सर्कल), पोस्ट : मालियासण, जि.-राजकोट. फोन : 9924343478

**भुज** : **त्रिमंदिर**, हिल गार्डनच्या मागे, एयरपोर्ट रोड. फोन : (02832) 290123

**अंजार** : **त्रिमंदिर**, अंजार-मुंद्रा रोड, सिनोग्रा पाटीया जवळ, सिनोग्रा गाँव, ता-अंजार. फोन : 9924346622

**मोरबी** : **त्रिमंदिर**, पो-जेपुर (मोरबी), नवलखी रोड, ता-मोरबी, जि-राजकोट, फोन : (02822) 297097

**सुरेन्द्रनगर** : **त्रिमंदिर**, लोकविद्यालय जवळ, सुरेन्द्रनगर-राजकोट हाईवे, मुळी रोड. फोन : 9879232877

**अमरेली** : **त्रिमंदिर**, लीलीया बायपास चोकडी, खारावाडी. फोन : 9924344460

**गोधरा** : **त्रिमंदिर**, भामैया गाँव, एफसीआई गोडाउन समोर, गोधरा, (जि.-पंचमहाल). फोन : (02672) 262300

**वडोदरा** : **त्रिमंदिर**, बाबरिया कोलेज जवळ, वडोदरा-सुरत हाई-वे NH-8, वरणामा गाँव. फोन : 9574001557

**अहमदाबाद** : **दादा दर्शन**, ५, ममतापार्क सोसाइटी, नवगुजरात कॉलेजच्या मागे, उस्मानपुरा, अहमदाबाद-380014. फोन : (079) 27540408

**वडोदरा** : **दादा मंदिर**, १७, मामानी पोळ-मुहल्ला, रावपुरा पुलिस स्टेशन समोर, सलाटवाड़ा, वडोदरा. फोन : 9924343335

| | | | |
|---|---|---|---|
| **मुंबई** | : 9323528901 | **दिल्ली** | : 9810098564 |
| **कोलकता** | : 9830093230 | **चेन्नई** | : 9380159957 |
| **जयपुर** | : 9351408285 | **भोपाल** | : 9425024405 |
| **इन्दौर** | : 9039936173 | **जबलपुर** | : 9425160428 |
| **रायपुर** | : 9329644433 | **भिलाई** | : 9827481336 |
| **पटना** | : 7352723132 | **अमरावती** | : 9422915064 |
| **बेंगलूर** | : 9590979099 | **हैदराबाद** | : 9989877786 |
| **पूणे** | : 9422660497 | **जालंधर** | : 9814063043 |

**U.S.A.** : **(D.B.V. I.)** +1 877-505-DADA (3232)

| | | | |
|---|---|---|---|
| **U.K.** | : +44 330-111-DADA (3232) | **UAE** | : +971 557316937 |
| **Kenya** | : +254 722 722 063 | **Singapore** | : +65 81129229 |
| **Australia** | : +61 421127947 | **New Zealand** | : +64 210376434 |

**Website : www.dadabhagwan.org**



## शुद्ध प्रेम स्वरुप, तोच परमात्मा

ज्ञानी पुरुषांचे शुद्ध प्रेम जे दिसते, असे उघडपणे दिसते, तोच परमात्मा. परमात्मा, ही दुसरी कोणतीही वस्तू नाही. शुद्ध प्रेम जे दिसते, जे वाढत नाही, घटत नाही, एकसमानच राहते, त्याचेच नाव परमात्मा, उघड-उघड परमात्मा! आणि ज्ञान, हा सूक्ष्म परमात्मा आहे, ज्ञान समजण्यास वेळ लागेल. म्हणून परमात्मा शोधण्यासाठी बाहेर जायचे नाही. बाहेर तर सर्व आसक्ती आहे.

\- दादाश्री



dadabhagwan.org




Printed in India

Price ₹20